








नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १७ वे ] मार्च १९६४ [ अंक ६



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सतरावे | अंक सहावा

# नवभारत

मार्च १९६४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४








# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड | भाग | १ | ते | ३ | | किंमत |
| साधी बांधणी ... | | ... | | ... | | ८०·०० |
| कापडी बांधणी ... | | ... | | ... | | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड | भाग | १ | ते | ४ | | |
| साधी बांधणी ... | | ... | | ... | | १५०·०० |
| कापडी बांधणी ... | | ... | | ... | | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड | भाग १ ला | | | .... | | ४५·०० |
| कापडी बांधणी ... | | .... | | ... | | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... | ... | ... | | ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... | भाग | १ | ते | ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | | ... | | ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः | .... | ... | | ... | | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) | | | | ... | | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास | ... | .. | | ... | | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... | ... | ... | | ... | | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... | ... | ... | | ... | | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | | | ... | | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) | | | | ... | | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) | | | | .... | | २·०० |

अनुक्रमणिका

ले. रॉबर्ट स्कॅलॅपिनो

# मॉस्को, पेकिंग आणि आशियातील कम्युनिस्ट पक्ष*: १ :

आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत आजच्यासारखे दुफळीचे दृश्य यापूर्वी कधीच दिसले नव्हते. चिनी कम्युनिस्ट आणि त्यांचे पाठीराखे यांच्या दृष्टीने टिटोच्या राजवटीशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित करण्याचे रशियन नेत्यांचे धोरण म्हणजे "क्रुश्चेव्ह गटा"च्या फेरवादी आणि मार्क्सवादविरोधी स्वरूपाचा आणखी एक पुरावा आहे. भारत-चीन संघर्षात भारत व चीन या दोघांनाही न दुखविण्याचे सोव्हिएट राज्यकर्त्यांचे संदिग्ध धोरण हाही चिनी नेत्यांच्या मते "समाजवादी भाईबंदा"ला संपूर्ण पाठिंबा न देण्याचा क्रुश्चेव्हच्या हातून घडलेला वैशिष्ट्यपूर्ण अपराध आहे. त्याचप्रमाणे क्युबामधून क्षेपणास्त्रे काढून घेण्याचा सोव्हिएट सरकारचा निर्णय म्हणजे अमेरिकन साम्राज्यवाद्यांची मनधरणी आहे, आणि या घटनेत दिसून आलेला आत्यंतिक शांततावाद व भ्याडपणा हीच आता रशियन राजनीतीची मार्गदर्शक सूत्रे बनली आहेत असा चीनचा दावा आहे.

सोव्हिएट पंतप्रधान आणि त्यांचे मित्र याना अर्थातच चीनचे आरोप मान्य नाहीत, आणि या आरोपांना त्यांच्याजवळ उत्तरे तयार आहेत. त्यांच्या मते आज मार्क्स–लेनिन–वादाचे सर्वात मोठे शत्रू पोथीनिष्ठ अगर संप्रदायवादी कम्युनिस्ट आहेत आणि हे संप्रदायवादी संकुचित राष्ट्रवादाचा मार्ग अनुसरीत आहेत, स्टॅलिनवादातील सर्वात वाईट वैशिष्ट्यांचे अनुकरण करीत आहेत, व जागतिक महायुद्धाचा धोका निर्माण करणाऱ्या साहसवादी धोरणांचा अवलंब करीत आहेत. क्रुश्चेव्हच्या गोटात जागतिक कम्युनिस्ट चळवळीची "पुढारलेल्या" व मागासलेल्या" घटकांमध्ये व 'मित्र' आणि 'शत्रू' समाजवादी राष्ट्रे अथवा गट यांच्यामध्ये विभागणी करण्याची प्रवृत्ति वाढीस लागत आहे.

रशिया आणि चीन यांच्यात समझोता घडवून आणण्याचे, निदान त्यांच्यातील जाहीर लाथाळी थांबवून एकत्र नांदण्यासाठी त्यांचे मन वळवण्याचे कम्युनिस्ट मध्यस्थांचे पराकाष्ठेचे प्रयत्न असफल ठरले आहेत, हे उघड आहे. सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनानंतर लगेच ज्या घटना घडल्या त्यांना यामुळे अधिक महत्व प्राप्त होते. या अधिवेशनानंतर पाच महिने सर्व जगाच्या समोर जाहीरपणे कम्युनिस्ट पक्ष व पुढारी आपसात भांडत होते. हे २२ वे अधिवेशन चालू असताना मध्यावरच चाऊ एन् लाय यांनी "थोर मार्क्स-लेनिन-वादी पुढारी" म्हणून स्टॅलिनचा गौरव करून त्याच्या थडग्यावर पुष्पांजलि वाहिली व नंतर अल्बानियासारख्या कम्युनिस्ट राष्ट्रावर जाहीर टीका केल्याबद्दल क्रुश्चेव्हची कडक शब्दात कानउघाडणी करून तावातावाने मॉस्कोहून प्रयाण केले तेव्हाच उघड भांडणाला प्रारंभ झाला. यानंतर अल्बानियन पुढाऱ्यांवर रशियाने चौफेर हल्ला सुरू केला, अल्बानिया आणि रशिया यांच्यातील राजनैतिक संबंध संपुष्टात आले, आणि चीन व अल्बानिया यांची मैत्री वाढीस लागली. आणि याच काळात रशिया व त्याचे दोस्त यांनी आपल्या भूमिकेला जागतिक कम्युनिस्ट चळवळीतील "प्रचंड बहुमता"चा पाठिंबा आहे अशा वारंवार घोषणा केल्या असताना आशियातील बहुतेक साऱ्या कम्युनिस्ट पक्षांनी महत्वाच्या प्रश्नांवर रशियाला पाठिंबा देण्यास नकार दिला.

क्रुश्चेव्ह यांनी अल्बानियन पुढारी होक्झा व शेहू यांचा बनावट मार्क्सवादी व दुष्ट जुलमशहा म्हणून धिःकार केला तरीही त्यानंतर उत्तर व्हिएटनाम, उत्तर कोरिया, इंडोनेशिया, ब्रह्मदेश, थायलंड व मलाया या देशातील कम्युनिस्ट पक्षांनी अल्बानियाला अभिनंदनपर मैत्रीचे संदेश पाठवले. आणि क्रुश्चेव्ह यांनी स्टॅलिनच्या दुष्कृत्यांचा पाढा वाचल्यानंतरही उ. कोरियाच्या राजधानीपासून ते जकार्तातील इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ति कार्यालयापर्यंत सर्वत्र स्टॅलिनचे पुतळे व फोटो आढळून येत होतेच.

---

* इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम् या संस्थेतर्फे प्रसिद्ध झालेल्या A New Look At Communism या पुस्तिकेतील लेखाचा अनुवाद.








कम्युनिस्ट चळवळीतील या पेचप्रसंगाच्या काळी आशियातील कम्युनिस्ट पुढाऱ्यांनी मॉस्को-पेकिंग-वादातील महत्वाच्या प्रश्नांवर स्वीकारलेल्या भूमिका हेच या पेचप्रसंगाचे ऐतिहासिक दृष्टया खरे महत्वपूर्ण वैशिष्टय ठरावे. या पेचप्रसंगी लाल चीनला एकाकी पाडण्याची मनीषा क्रुश्चेव्ह यांनी बाळगली असेल तर त्यात त्यांना अपयश आले आहे. आणि पूर्व आशियात-तर हे अपयश ढळढळीतपणे उघड झाले आहे. या भागात बाह्य मंगोलिया व सिलोन या दोनच देशा-तील कम्युनिस्ट पक्षांनी त्यांना लगेच पाठिंबा दिला आहे. इतरत्र त्यांना संपूर्ण पाठिंबा मिळू शकलेला नाही. आणि या वादामुळे आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळ-वळीत एका नव्या प्रवृत्तीचा- तटस्थतेचा- उदय झाला आहे. आशियातील बहुसंख्य कम्युनिस्ट पक्षांनी मॉस्को-पेकिंग-तंट्यात अलिप्ततेची भूमिका स्वीकारलेली आहे. आणि ही अलिप्ततेची भूमिका म्हणजे क्रुश्चेव्ह यांचा पराभवच आहे, कारण अनेक बाबतीत ही अलिप्तता पेकिंगकडे झुकणारी आहे.

( २ )

या तंट्यात सुरुवातीस क्रुश्चेव्ह यांना बाह्य मंगो-लिया व सिलोन हे दोन साथीदार लाभले. १९ ऑक्टो-बर १९६१ रोजी त्यांनी सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनात भाषण केले आणि त्यानंतर दोनच दिव-सांनी मंगोलियन पक्षाच्या प्रतिनिधि-मंडळाचे नेते त्झेडेन्बाल् यांनी त्याच अधिवेशनात रशियन भूमिकेला संपूर्ण पाठिंबा देणारे भाषण केले. व्यक्तिपूजेच्या संप्र-दायाविरुद्ध खंबीर भूमिका घेतल्याबद्दल त्यांनी सोव्हि-एट नेत्यांचे अभिनंदन केले व अल्बानियन कम्युनिस्ट पक्षाच्या नेत्यांच्या फूटपाड्या " मार्क्सवादविरोधी " कारवायांचा उघडपणे धिःकार केला. मंगोलियन नेत्यांच्या या रशियाधार्जिण्या भूमिकेचा यानंतर ( मंगोलियाची राजधानी ) उलन बटॉर येथे ठासून पुनरुच्चार करण्यात आला. नोव्हेंबरच्या अखेरीस मंगोलियन लोकसभेचे अध्यक्ष त्झेंद यांनी अल्बानियन पंतप्रधान होक्झा व त्यांचे हस्तक यांच्यावर ते " राष्ट्र-वादाच्या कर्दमात रुतल्या "बद्दल जोरदार हल्ला चढ-वला. आपल्या टीकेतून त्यांनी चिनी पुढाऱ्यांनाही वगळले नाही. कम्युनिस्ट पक्षांमधील मतभेदांची खाजगी रीतीने चर्चा करण्याबद्दलचा चिनी पुढाऱ्यांचा आग्रह व्यर्थ व सत्याशी प्रतारणा करणारा आहे, कारण हे मतभेद जगजाहीर आहेत, असे स्पष्ट मत त्यांनी व्यक्त केले. मंगोलियन पक्षाच्या मध्यवर्ति समितीत १९६२ च्या जानेवारीत सोव्हिएट पक्षाच्या अधिवेशनाबद्दलचा अहवाल सादर करताना त्झेडेन्बाल् यांनी आपल्या पक्षाची भूमिका अधिकृतरीत्या जाहीर केली. त्यांनी पुन्हा अल्बानियाचा कडक शब्दात निषेध केला व क्रुश्चेव्ह यांच्या पावलावर पाऊल ठेवून मंगोलियाचे ( १९५२ साली मृत्यू पावलेले ) माजी पंतप्रधान चोइ-बाल्सन् यांच्याभोवती निर्माण करण्यात आलेले व्यक्ति-पूजेचे वलय नष्ट करण्यात यावे असा आदेश दिला. अशा रीतीने बाह्य मंगोलियाच्या पुढाऱ्यांनी रशियाला संपूर्ण पाठिंबा जाहीर केला.

सिलोनी कम्युनिस्ट पक्षाची भूमिकाही मॉस्कोला अनु-कूल अशी आहे. २५ ऑक्टोबर १९६१ रोजी सिलोनी कम्युनिस्ट पक्षाचे सरचिटणीस पीटर क्यूनेमान यांनी सोव्हिएट पक्षाच्या अधिवेशनात भाषण केले. त्यात त्यांनी व्यक्तिपूजेच्या संप्रदायाला विरोध केला व " कामकरी आंतरराष्ट्रीयवादा '– ( Proletarian internationalism ) शी विसंगत अशी भूमिका घेतल्याबद्दल अल्बानियन पुढाऱ्यांची निर्भर्त्सना केली. यानंतर ८ एप्रिल १९६२ रोजी सिलोनी कम्युनिस्ट पक्षाने एक ठराव संमत करून आपली भूमिका अधिकृत-पणे जाहीर केली. या ठरावात होक्झा यांनी " रशियन कम्युनिस्ट पक्ष व नेते यांच्यावर फेरवादी असल्याचा व साम्राज्यवाद्यांपुढे लांगूलचालन करण्याचा अधमपणे आरोप केला आहे, व्यक्तिपूजेच्या संप्रदायातील सर्वात वाईट व हानिकारक वैशिष्ट्यांचे समर्थन व स्तवन केले आहे, सोव्हिएट पक्षाच्या २० व्या अधिवेशनात संमत झालेल्या निर्णयांचे महत्त्व व शांततामय सह-जीवन यासारख्या मूलभूत प्रश्नांवरील आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीने संमत केलेल्या भूमिकेला उघड आव्हान दिले आहे व निरनिराळ्या देशातील कम्युनिस्ट पक्षांशी संबंध ठेवताना कुटिल भेदभाव व्यक्त करून आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत फूट पाडण्याचा प्रयत्न केला आहे, " इत्यादि आरोपांची लांबलचक यादी मांडण्यात आली आहे. या यादीत क्रुश्चेव्ह यांनाही भर घालता आली नसती इतकी ती सर्वांगीण व संपूर्ण आहे !



अनुक्रमणिका






स्टॅलिनच्या कार्याच्या मूल्यमापनाच्या प्रश्नाबाबत सिलोनी कम्युनिस्टांची परिस्थिती जराशी नाजुक होती. कारण सिलोनमध्ये ट्रॉट्स्कीवादी हे कम्युनिस्टांना "डावे प्रतिस्पर्धी" म्हणून कार्य करीत आहेत. कम्युनिस्टांची स्टॅलिनविरोधी भूमिका हा ट्रॉट्स्कीवाद्यांचा ऐतिहासिक तात्त्विक विजय आहे असा दावा ट्रॉट्स्कीवाद्यांनी मांडणे साहजिकच होते. पण याही बाबतीत निधडे-पणाने ही जोखीम पत्करण्याचे ठरवून सिलोनी कम्युनिस्ट पक्षाने क्रुश्चेव्ह यांचे अनुयायित्व स्वीकारले. सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनात क्रुश्चेव्ह यांनी आपली स्टॅलिनविरोधी मोहीम आणखी पुढे रेटली होती. तिलाही सिलोनी कम्युनिस्टांनी पाठिंबा दिला, व १९३४ सालापासूनच स्टॅलिनच्या व्यक्तिमत्त्वातील "हानिकारक वैशिष्ट्ये" ( Negative aspects ) दृग्गोचर होऊ लागली होती अशी कबुली दिली. अर्थात् ही कबुली देताना ट्रॉट्स्कीवाद्यांची भूमिका विपर्यस्त आहे व त्यांच्या सिद्धान्तांची इतिहासानेच वासलात लावली आहे, असा हवाला देण्यास ते विसरले नाहीत !

( ३ )

असा भरघोस पाठिंबा रशियाला पूर्व आशियात दुसरीकडे कोठेच लाभला नाही. आग्नेय आशियातील कम्युनिस्ट पक्षांची या व तत्संबंध इतर प्रश्नांवरील भूमिका मॉस्कोला फारशी अनुकूल नव्हती. या प्रश्नांवर सोइस्कर मौन पाळण्यापासून ते क्रुश्चेव्ह यांच्या उक्ति व कृतींबद्दल उघड नापसंती व्यक्त करण्यापर्यंत नाना प्रकारच्या प्रतिक्रिया या पक्षामार्फत व्यक्त करण्यात आल्या.

स्टॅलिनविरोधी मोहीम व अल्बानिया या प्रश्नांवर इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाने जी भूमिका स्वीकारली तिला फार महत्त्व आहे. आज इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाचे २० लाख सभासद आहेत व पक्षाच्या नियंत्रणा-खाली असलेल्या संघटनांमध्ये आणखी लाखो लोक सामील आहेत. म्हणजे कम्युनिस्ट राष्ट्रगटाबाहेरील कम्युनिस्ट पक्षात इंडोनेशियन पक्ष हा सर्वांत प्रबळ आहे. म्हणूनच इंडोनेशियन कम्युनिस्टांनी आपली भूमिका जाहीर केली ती क्रुश्चेव्ह यांना खास झोंबणारी होती. अधिकृत रीत्या इंडोनेशियन कम्युनिस्टांनी अलिप्ततावादी पवित्रा घेतला होता, पण रशिया-चीन तेढीतील प्रमुख प्रश्नांवर त्यांची भूमिका चीनला जास्त अनुकूल होती.

त्यांच्या मते क्रुश्चेव्ह यांनी अल्बानियन पुढाऱ्यांवर जाहीर टीका केली, हे अयोग्य झाले. या बाबतीत इंडोनेशियन पक्ष सोव्हिएट नेत्यांचे अनुकरण करण्यास तयार नव्हता. इतर पक्षांशी सल्लामसलत करून व अल्बानियन पुढाऱ्यांशी आधी खासगी रीतीने वाटा-घाटी करून मतभेद मिटवण्याचा मार्ग न अनुसरता क्रुश्चेव्ह यांनी जाहीर टीकेचा अवलंब केला. त्यांचे हे कृत्य म्हणजे १९६० च्या मॉस्को ठरावातील आदे-शांचा भंग होता.

स्टॅलिनच्या गुणदोषांचे मूल्यमापन व सोव्हिएट पक्षातील "पक्षविरोधी गट" हे प्रश्न इंडोनेशियन कम्यु-निस्टांच्या मते सोव्हिएट पक्षाची अंतर्गत बाब होतो. त्या प्रश्नांचा निर्णय त्या पक्षानेच करावयाचा होता. पण त्याचबरोबर स्टॅलिन हा केवळ रशियाचा राष्ट्रीय पुढारी नव्हता. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचाही तो महान् नेता होता. म्हणजे त्याच्या कार्याचे मूल्य-मापन ही केवळ सोव्हिएट पुढाऱ्यांच्या अखत्यारातील बाब नव्हती. स्टॅलिनची व्यक्तिपूजा निषेधार्ह होती हे कबूल. पण त्याचबरोबर १९२४ ते १९५३ या काळात स्टॅलिनने आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीला हे बहु-मोल तात्त्विक व व्यावहारिक नेतृत्व पुरविले त्याचा इंडोनेशियन पक्षाला कधीही विसर पडणे शक्य नव्हते. ( या विधानातील १९२४ ते १९५३ हा काळ म्हणजे स्टॅलिन अधिकारारूढ झाल्यापासून ते त्याच्या मृत्यूपर्यंतचा प्रदीर्घ काळ आहे हे लक्षात ठेवणे जरूर आहे. )

याशिवाय इंडोनेशियन कम्युनिस्टांच्या मते प्रत्येक कम्युनिस्ट पक्षाला संपूर्ण स्वातंत्र्य व समान दर्जा लाभणे आवश्यक आहे. "समाजवादी गट" म्हणजे प्रजासत्ताक राज्य किंवा एखादी राजकीय संघटना नाही. तो संपूर्णतया स्वतंत्र व समान दर्जा असलेल्या कम्युनिस्ट पक्षांचा समूह आहे. त्यातील प्रत्येक पक्षाला आपल्या देशातील विशिष्ट परिस्थित्यनुसार आपले धोरण व कार्यक्रम आखण्याचे स्वातंत्र्य आहे. इतर पक्षांच्या अनुभवांवरून योग्य तो बोध घेणे जरूर आहे, हे खरे; पण दुसऱ्या पक्षाची ताबेदारी पत्करावी लागणे

हे निषिद्ध आहे. म्हणूनच समाजवादी गटातील पक्षांना "अधिक स्वायत्तता" देण्याची अगर आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत एका मध्यवर्ती सत्ताकेंद्राऐवजी अनेक सत्ताकेन्द्रे निर्माण झाली असल्याची भाषा दिशाभूल करणारी आहे. प्रत्येक कम्युनिस्ट पक्षाला संपूर्ण स्वातंत्र्य लाभणे हेच केवळ आता मान्य होण्याजोगे आहे. म्हणूनच अल्बानियासारख्या एका समाजवादी राष्ट्राचा रशियासारख्या दुसऱ्या समाजवादी राष्ट्राशी तंटा निर्माण झाला म्हणून त्याला (अल्बानियाला) समाजवादी राष्ट्रगटातून हाकलून देणे अगर वाळीत टाकणे किंवा त्याच्या समाजवादी स्वरूपाबद्दलच शंका घेणे योग्य ठरणार नाही.

इंडोनेशियन कम्युनिस्टांचा चौथा मुद्दाही वरील भूमिकेशी निगडित आहे. प्रत्येक कम्युनिस्ट पक्षाचे कर्तव्य मार्क्स-लेनिन वादाची तत्वे आपल्या देशातील विशिष्ट परिस्थितीला लागू करावयाची हे आहे. म्हणजेच इंडोनेशियन पक्षाचे कार्य मार्क्स-लेनिन-वादी सिद्धान्तांचे "इंडोनेशियनीकरण" करावयाचे हे आहे. प्राप्त परिस्थितीत या "इंडोनेशियनीकरणा"चे खास वैशिष्ट्य म्हणजे इंडोनेशियन पक्षाच्या कार्यक्रमाला देण्यात आलेले चिनी वळण. चिनी कम्युनिस्टांच्या प्रमाणेच इंडोनेशियन कम्युनिस्टांचा चालू कार्यक्रमही "तीन लाल झेंड्यां"चा आहे. हे तीन लाल झेंडे म्हणजे राष्ट्रीय आघाडी, पक्ष-संवर्धन व १९४५ च्या ऑगस्ट-क्रान्तीची पूर्ति. त्याचप्रमाणे चिनी कम्युनिस्टांच्या पावलांवर पाऊल टाकून इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षही आता "यापुढे जगातील ९० टक्के जनतेची नवोदित व वर्धिष्णु शक्ति व उर्वरित १० टक्के जनतेची जीर्ण प्रस्थापित शक्ति" यांच्यामध्ये खरा संघर्ष असल्याचा दावा मांडीत आहे. माओत्से-तुंगही आजवर जगातील ९० टक्के जनतेची एकजूट करून उरलेल्या १० टक्के "शत्रू"शी सामना देण्याचा आदेश देत आला आहे, हे या संदर्भात ध्यानात ठेवणे जरूर आहे.

या साऱ्या भूमिकेचे तात्पर्य म्हणजे आज जागतिक कम्युनिस्ट चळवळीला खरा धोका फेरवादाचा आहे. इंडोनेशियन कम्युनिस्टांच्या मते या फेरवादाचे प्रमुख उदाहरण युगोस्लाव्हिया आहे. सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनाला युगोस्लाव्हियाने दिलेला पाठिंबा म्हणजे कम्युनिस्ट चळवळीत "दुहीचे बीष" पेरण्याचा घातकी कावा आहे. युगोस्लाव्हियाला समाजवादी गटात स्थान नाही, टिटोची राजवट म्हणजे "अमेरिकन साम्राज्यवाद्यांचे कळसूत्री बाहुले" आहे. या उलट अल्बानिया हे खरेखुरे समाजवादी राष्ट्र आहे. रशियन नेत्यांच्या आज्ञेवरून समाजवादी गटातून त्यांची हकालपट्टी करणे न्याय्य ठरणार नाही.

इंडोनेशियन कम्युनिस्टांच्या या भूमिकेतील काही पवित्रे १९६० मध्ये संमत केलेल्या मॉस्को निवेदनावर आधारलेले आहेत. पण ज्या विशिष्ट मुद्यांवर त्यांनी भर दिला आहे ते मुद्दे सूचक आहेत. त्याचप्रमाणे चिनी व इंडोनेशियन कम्युनिस्टांच्या डावपेच-कल्पनांमधील साधर्म्यही बोलके आहे. गेल्या काही महिन्यात युगोस्लाव्हिया, भारतीय सीमाप्रश्न व क्युबा या बाबतीत चीनच्या भूमिकेला पाठिंबा देऊन इंडोनेशियन कम्युनिस्टांनी आपला चीन-धार्जिणा कल सुस्पष्ट केला आहे. क्यूबामधून क्षेपणास्त्रे काढून घेण्याच्या रशियन निर्णयाचे इंडोनेशियन कम्युनिस्ट पुढारी ऐदित् याने "क्युबन् जनतेला तिच्या इच्छेविरुद्ध करावा लागलेला खेदजनक त्याग" असे वर्णन केले. त्याच्या निवेदनात कणखर धोरण स्वीकारण्याची मागणी होती. म्हणूनच त्याच्या निवेदनाला चीनने भरपूर प्रसिद्धी दिली. रशिया चीन तंट्यात कोणत्याही प्रकारच्या अलिप्ततावादाची कास धरणे मॉस्कोला आवडणारे नाही. पण इंडोनेशियन भाईंचा हा झुकता अलिप्ततावाद मॉस्कोला जास्त असह्य होणे साहजिक आहे.

उ. कोरिया व उ. व्हिएटनाम या देशातील कम्युनिस्टांनी जी अलिप्ततावादी भूमिका स्वीकारली ती तरी मॉस्कोला कितपत अनुकूल आहे ?

उ. कोरियात आज किम् इल्-सॉंगची पोलादी हुकुमशाही चालू आहे. गेली दहा-बारा वर्षे पक्षांतर्गत प्रतिस्पर्ध्यांशी निकराने लढा देऊन किम्ने आपल्या सर्व विरोधकांचा काटा काढला आहे. उ. कोरियाच्या राजकारणात आज किम्चे सर्वत्र वर्चस्व आहे. त्याच्या गटात दुसऱ्या महायुद्धात किम्बरोबर मांचुरियात जपान-विरोधी लढाईत भाग घेणाऱ्या त्याच्या साथीदारांचा भरणा आहे. या सर्वांचे एक समान वैशिष्ट्य म्हणजे



अनुक्रमणिका







किमूला संपूर्णपणे वाहिलेली त्यांची निष्ठा. किम् आज ५० वर्षे वयाचा आहे. उत्तर कोरियाचा पंतप्रधान, सेनाप्रमुख, व कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ति समितीचा अध्यक्ष ही सारी अधिकारपदे त्याने आपल्या ताब्यात ठेवली आहेत. म्हणजेच उ० कोरियात आज किमूची स्टॅलिनवादी राजवट प्रस्थापित झाली आहे.

अल्बानियाच्या प्रश्नावर उ० कोरियाची भूमिका सुरुवातीस सावध अलिप्ततावादी होती : सोव्हिएट पक्ष व अल्बानिया यांच्यातील संबंध "बिघडलेले" आहेत. व ही परिस्थिती सुधारली नाही तर त्यामुळे कम्युनिस्ट चळवळीची "गंभीर हानि" होईल. या पेचप्रसंगावर तोडगा म्हणजे १९५७ व १९६० च्या मॉस्को अधिवेशनात ठरवण्यात आल्याप्रमाणे रशियन व अल्बानियन नेत्यांनी आपसात चर्चा करून परस्पर समजुतीने हे मतभेद मिटवणे जरूर आहे.

स्टॅलिनच्या कार्याचे मूल्यमापन व पक्षद्रोही गटाच्या कारवाया हे रशियन पक्षाचे अंतर्गत प्रश्न आहेत. साहजिकच उ० कोरियन पक्षाने त्या प्रश्नाची चर्चा करणे योग्य ठरणार नाही. पण त्याचबरोबर स्टॅलिन हा जागतिक कम्युनिस्ट चळवळीचा महान व जगविख्यात पुढारी होता, व जगातील आम जनता त्याला मानीत होती. म्हणजे क्रुश्चेव्ह यांची स्टॅलिन-विरोधी मोहीम उ० कोरियन पक्षाला मान्य नव्हती. रशियात स्टॅलिनचे शव लाल चौकातील थडग्यातून उकरून काढण्यात आले, पण उ० कोरियात त्याची चित्रे व पुतळे यांना दिलेले मानाचे स्थान कायमच राखण्यात आले.

१९६२ च्या हिवाळयात उ० कोरियन पुढाऱ्यांनी आपला चीनधार्जिणा कल आणखी स्पष्ट केला. सोव्हिएट राष्ट्राध्यक्ष ब्रेझनेव्ह यांनी युगोस्लाव्हियाला भेट दिल्यानंतर लगेच चीन-अल्बानिया यांनी युगोस्लाव्हियावर जहरी टीका करण्यास सुरुवात केली. लगेच उ० कोरियन पुढाऱ्यांनी त्यांची री ओढली. युगोस्लाव्ह नेते अमेरिकन साम्राज्यवादाचे हस्तक आहेत; समाजवादी गटाची एकजूट मोडणारे फूटपाडे आहेत, असा किमूने जाहीर आरोप केला. इतकेच नव्हे तर सर्वच "फेरवादी" कम्युनिस्टांनी समाजवादी राष्ट्रांची बदनामी करण्याचा व त्यांच्याविरुद्ध कटकारस्थाने करण्याचा चंग बांधला आहे असाही चौफेर हल्ला त्याने चढवला. याहीपुढे जाऊन "कोणतेही समाजवादी राष्ट्र दुसऱ्या समाजवादी राष्ट्राविरुद्ध भूमिका घेऊ शकणार नाही वा आपली मते त्याच्यावर लादू शकणार नाही," असेही क्रुश्चेव्ह यांना अप्रत्यक्षरीत्या सुनावण्यास त्याने कमी केले नाही.

उ० कोरियन पुढाऱ्यांनी भारत–चीन संघर्षात चीनला व क्युबा–अमेरिका तंट्यात क्युबाला संपूर्ण पाठिंबा जाहीर केला. त्यातही महत्त्वाची गोष्ट म्हणजे "शांतता ही याचना करून मिळणार नाही, तर साम्राज्यवाद्यांना प्रत्येक ठिकाणी तडाखे देऊन साम्राज्यवादविरोधी लढ्यातून ती प्राप्त करून घ्यायची आहे" अशी लढाऊ घोषणाही त्यांनी केली. उ० कोरियन नेत्यांचाही हा चीनकडे झुकणारा अलिप्ततावाद क्रुश्चेव्ह यांना अस्वस्थ करणारा होता.

सोव्हिएट पक्षाच्या २२व्या अधिवेशनानंतर उ० कोरियन पक्षाने अवलंबिलेले डावपेचही उद्बोधक होते. ७ नोव्हेंबर १९६१ रोजी ऑक्टोबर क्रांतीच्या ४४व्या वाढदिवसानिमित्ताने त्यांनी सोव्हिएट पुढाऱ्यांना अभिनंदन व स्तुतीचा वर्षाव करणारा संदेश पाठवला. तर दुसऱ्याच दिवशी, आठ नोव्हेंबर रोजी, अल्बानियन कम्युनिस्ट पक्षाच्या २०व्या स्थापनादिनानिमित्ताने त्यांनी अल्बानियन पुढाऱ्यांनाही अभिवादनाचा संदेश पाठवला. या संदेशात त्यांनी अल्बानियात पुरोगामी समाजवादी राजवट प्रस्थापित करण्यासाठी यशस्वीपणे लढा दिल्याबद्दल व धैर्याने साम्राज्यवादी व "त्यांचे हस्तक युगोस्लाव्ह फेरवादी पुढारी" यांना ठामपणे विरोध केल्याबद्दल अल्बानियन पक्षाची स्तुति केली. त्याचबरोबर "रशियन नेतृत्वाखालील समाजवादी गटाच्या विशाल कुटुंबात "उत्तर कोरिया व अल्बानिया यांच्यातील मैत्री चिरकाल कायम राहील म्हणून उ० कोरियातर्फे आश्वासनही देण्यात आले!

कम्युनिस्ट अलिप्ततावादाचे सर्वसामान्य विवेचन करण्यापूर्वी उ० व्हिएटनामच्या कम्युनिस्ट पक्षाचेही धोरण तपासणे उपयुक्त ठरेल. या पक्षानेही बाह्यतः व जाहीररीत्या अलिप्ततावाद अत्यंत काटेकोरपणे पाळला आहे. उ० व्हिएटनामी कम्युनिस्ट पक्ष हा महत्वाचा पक्ष आहे. उ० व्हिएटनामवर त्याचे खंबीर नियंत्रण

आहे. दक्षिण व्हिएटनाममध्येही दूरवर त्यांच्या हस्तकांचे जाळे पसरलेले आहे. लाओसमधील पाथेट लाओ या कम्युनिस्ट पक्षाला तो बंधुभावाने साहाय्य करीत आहे व शेजारच्या कंबोडियातही त्याचे हस्तक मोठ्या संख्येने वावरत आहेत. पाच लाख सभासद असलेला हा पक्ष आग्नेय आशियातील सर्वांत महत्त्वाचा कम्युनिस्ट पक्ष आहे. या पक्षाचे नेते हो चि मिन्ह हे कम्युनिस्ट चळवळीतील एक वयोवृद्ध व जाणते पुढारी आहेत. आज त्यांचे वय ७० आहे. म्हणजे ते क्रुश्चेव्ह व माओ यांच्यापेक्षाही वयोवृद्ध आहेत. लेनिनच्या हयातीत ते मॉस्कोत कम्युनिझमचे धडे शिकत होते. त्यामुळे आजवर उत्तर व्हिएटनामचे " राष्ट्रपिता " व अनुभवी कम्युनिस्ट पुढारी या दोनही भूमिका त्यांनी एकदम व यशस्वीपणे वठवल्या आहेत. रशिया–चीन तंट्यात मध्यस्थी करण्यास होंच्या इतका लायक पुढारी आढळणे कठीण होते. त्याप्रमाणे त्यांनी मध्यस्थीचा प्रयत्न काही महिने केलाही. पण तो अयशस्वी ठरला.

सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनाबद्दल उ० व्हिएटनामी पक्षाने जे निवेदन प्रसिद्ध केले त्यात अल्बानिया किंवा स्टॅलिनविरोधी मोहीम यांचा उल्लेख कटाक्षाने टाळण्यात आला होता. त्याऐवजी सोव्हिएट पक्षाच्या नानाविध कामगिरीचा गौरव करण्यात आला व " सोव्हिएट पक्ष केंद्रस्थानी असलेल्या " कम्युनिस्ट गटाच्या सभासदांमधील अभंग एकजूट टिकवण्यासाठी अविरत प्रयत्न करण्याचा निर्धार व्यक्त करण्यात आला. उ० कोरियाप्रमाणेच उ० व्हिएटनामनेही ७ व ८ नोव्हेंबर १९६२ या दिवशी रशिया व अल्बानिया या दोघांनाही अभिनंदनाचे संदेश पाठवले. पक्षाच्या मध्यवर्ती मुखपत्रात ( Nhan Dan मध्ये ) ७ नोव्हेंबर रोजी सोव्हिएट युनियन, सोव्हिएट पक्ष व नेते यांना भरघोस पाठिंबा देणारा अग्रलेख व संदेश प्रसिद्ध करण्यात आला. दुसऱ्या दिवशी, ८ नोव्हेंबर रोजी अल्बानियन पक्षाचे हार्दिक अभिनंदन करणारा अग्रलेख व संदेश प्रसिद्ध करण्यात आला व त्याचबरोबर अल्बानियन पुढारी होक्झा याचा फोटोही छापण्यात आला. ९ नोव्हेंबर रोजी Nhan Dan ने आपल्या अंकात आदल्या दिवशी अल्बानियन पुढाऱ्यांना पाठवण्यात आलेला जो संदेश प्रसिद्ध करण्यात आला होता त्यात एक महत्त्वाचे वाक्य छापण्याचे चुकून राहून गेले म्हणून दिलगिरी व्यक्त केली व पुढील वाक्य त्या संदेशात घातले : " मार्क्स-लेनिन-वादाच्या तत्त्वानुसार आचरण करून तुमच्या ( अल्बानियन ) पक्षाने नेहमीच आपले तात्त्विक सामर्थ्य कायम राखण्याचा प्रयत्न केला आहे व युगोस्लाव्ह फेरवादाविरुद्ध निकराने लढा दिला आहे. अल्बानियन जनतेमध्ये तुमच्या पक्षाचा प्रभाव व त्याची प्रतिष्ठा दिवसेदिवस वाढतच आली आहे. "

अलीकडच्या काही घटना उ. व्हिएटनामला आपला काटेकोर अलिप्ततावाद टिकवणे आता कठीण होत चालले आहे याच्या निदर्शक आहेत. १९६२ च्या ऑक्टोबरमध्ये क्युबा व भारतीय उत्तर सीमा या ठिकाणी पेचप्रसंग उद्भवला असताना पेंग चेन्‌च्या नेतृत्वाखाली चीनच्या नॅशनल पीपल्स काँग्रेसच्या प्रतिनिधी-मंडळाने उ. व्हिएटनामला भेट दिली. या भेटीच्या प्रसंगी केलेल्या अनेक भाषणात पेंगने " चिनी-व्हिएटनामी मैत्री अनेक कसोट्यांना उतरली आहे व अनेक वादळातून टिकून राहिली आहे " अशी सूचक बढाई मारली. व्हिएटनामी प्रवक्त्यांनीही चिनी पाहुण्यांच्या विधानांना साद दिली. त्यांनी चिनी सरकार व जनता यांच्या अचूक परराष्ट्रीय धोरणाची वारेमाप स्तुती केली व या धोरणामुळे समाजवादी गटाला बळकटी आली आहे, राष्ट्रीय मुक्तीच्या चळवळींना सामर्थ्य प्राप्त झाले आहे व जागतिक शांततेचे रक्षण झाले आहे अशी प्रशस्ती बहाल केली. यानंतर भारत-चीन संघर्षात उ. व्हिएटनामने चीनच्या " योग्य भूमिके " ला संपूर्ण पाठिंबा जाहीर केला व क्युबाच्या प्रश्नावरही चीनला इमाने साथ दिली.

आजवर आशियातील कम्युनिस्ट तटस्थतावाद्यांनी आपली अलिप्ततावादी कसरत टिकवण्यासाठी खालील डावपेच लढवले आहेत.

(१) सोव्हिएट युनियन व सोव्हिएट कम्युनिस्ट पक्ष यांना आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत वडीलकीचा अगर नेतृत्वाचा मान द्यावयाचा. सोव्हिएट रशिया हे जगातील पहिले कम्युनिस्ट राष्ट्र आहे व ते औद्योगिक, वैज्ञानिक व लष्करी दृष्ट्या सर्वांत पुढारलेले



अनुक्रमणिका








असे " समाजवादी " राष्ट्र आहे या वस्तुस्थितीचा निर्देशक असा हा मान आहे.

(२) रशिया व चीन यांच्यासंबंधी लिहिताना दोघांनाही साधारणतः सारखीच जागा द्यावयाची व दोघांचे वर्णन करताना सर्वसाधारणतः समान शब्दप्रयोग योजावयाचे. रशियाचा अनुभव, ज्येष्ठ दर्जा, व त्याची प्रगती यांचा मान राखण्यासाठी रशियाबद्दल जरासा जास्त आदरभाव दाखवला तरी चालेल. पण विवाद्य मुद्यांबाबत मात्र तडजोडीला अगर माघारीला जागा नाही.

(३) जाहीर रीत्या सर्वच कम्युनिस्ट पक्षांची व राष्ट्रांची स्तुती करावयाची. याला अपवाद फक्त युगोस्लाव्हियाचा. युगोस्लाव्हिया हे फेरवादी व मार्क्सवादविरोध राष्ट्र मानावयाचे.

(४) " १२ समाजवादी मित्रराष्ट्रां"च्या ऐक्याची सर्वोच्च निवड आहे या मुद्यावर नेहमी भर द्यावयाचा. (या १२ राष्ट्रात अर्थात् अल्बानियाचाही समावेश होतो ) हे ऐक्य अभंग राखण्याची प्रत्येक कम्युनिस्ट पक्षावर जबाबदारी आहे याची सतत आठवण करून द्यावयाची. १९६० च्या मॉस्को निवेदनात निरनिराळ्या पक्षांमधील संबंध मैत्रीचे राखण्यासाठी जी मार्गदर्शक सूत्रे आखून देण्यात आली आहेत त्याच्यावर भर द्यावयाचा. पक्षांतर्गत व्यवहारात " लोकशाही-प्रधान केंद्रीकरणा- " ( Democratic centralism ) च्या नियमानुसार निर्णय घेण्यात यावेत व अल्पमतवाल्यांनी बहुमतवाल्यांचा निर्णय मान्य करणे जरूर आहे. पण आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत कोणताही निर्णय निरनिराळ्या पक्षांशी विचारविनिमय करून सर्वांच्या संमतीने व एकमताने घेण्यात यावा. म्हणजेच कोणत्याही पक्षाच्या स्वातंत्र्याला व समानदर्जाला बाध येऊ नये.

-( अपूर्ण )


## नवभारत मासिक

प्रकाशन स्थळ : ३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशन दिनांक : दरमहा एक तारीख.

मुद्रकः मधुकर शंकर साठे.
जात : हिंदु.
पत्ता : दि प्राज्ञ प्रेस,
३१५ गंगापुरी वाई.

प्रकाशक : वि. म. बेडेकर.
जात : हिंदु.
पत्ता : ३१५ गंगापुरी वाई.

-प्रा. वि. म. बेडेकर.
जात : हिंदु.
पत्ता : ७८३ शिवाजीनगर पुणें ४.

-प्रा. गोवर्धन पारीख, का. संपादक.
जात : हिंदु.
पत्ता : गणेशभुवन, २७६ तेलंग रोड
माटुंगा-मुंबई १९.

मालक : प्राज्ञ पाठशाळा मंडळ
गंगापुरी, वाई

[ रूल नंबर ८, रजिस्ट्रेशन ऑफ् न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वयें प्रकाशित ].

अनुवादक : भि. वि. मराठे

# समाजवादाची अल्बेर कामूकृत समीक्षा : १ :

## मार्क्सची भविष्यवाणी !

कृषिप्रधान अर्थपद्धतीतून उद्योगप्रधान अर्थपद्धतीत पदार्पण करताना १९ व्या शतकात इंग्लंडला भयंकर हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या; आणि औद्योगिक क्रांतीच्या या संक्रमण कालानेच भांडवलशाहीच्या बाल्यावस्थेची मनोवेधक मीमांसा करण्याकरिता कार्ल मार्क्सला भरपूर साहित्य पुरविले. पण समाजवादाविषयी बोलायचे झाल्यास, फ्रेंच राज्यक्रांतीच्या शोधाबोधातून प्रेरित झालेला समाजवाद आणि त्याचे सैद्धान्तिक स्वरूप यांतील तफावत दृष्टिआड करूनही, मार्क्सला भविष्य काळाच्या भाषेत आणि अमूर्त स्वरूपात बोलावे लागले. यामुळेच समाजवादी विचारसरणी, ग्राह्य अशी एक चिकित्सापद्धति आणि संशयास्पद मूल्यांचा कल्पनारम्य प्रेषितवाद (Utopian Messianism) यांचे एक झकास मिश्रण बनू शकली यात नवल नाही. ही चिकित्सापद्धति अशी होती की तिने वास्तवतेशी जुळवून घ्यावयास हवे होते; पण दुर्दैवाने, तसे न होता उलट ती भवितव्यतेवरील (Prophecy) श्रद्धेच्या आहारी जाऊन वस्तुस्थितीपासून दुरावत गेली. ही विसंगति मार्क्सच्या आयुष्यातच प्रगट होऊ लागली होती. कम्युनिस्ट जाहीरनाम्यानंतर (Communist Manifesto) वीस वर्षांनी मार्क्सचा 'कॅपिटल' (Das Capital) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. तोपर्यंत, जाहीरनाम्यातील बरेचसे सिद्धान्त निश्चितपणे बरोबर मानणे कठीण झाले. आणि तत्कालीन परिस्थितीशी अनुरूप असा बदल घडवून आणणाऱ्या नवीन सामाजिक व आर्थिक घटनांचा, आयुष्याच्या शेवटी शेवटी मार्क्सवर प्रभाव पडल्यामुळे 'कॅपिटल' हा ग्रंथ अपूर्णच राहिला. या कालातील मार्क्सचे लिखाण अप्रकाशितच राहिले. १९३५ साली तर मास्कोमधील मार्क्स-एंजल्स इन्स्टिटयूट बंद करण्यात आली. २१ ग्रंथ भरतील एवढे हे विपुल साहित्य अप्रकाशित राहिले, याचे कारण, ते निःसंशय 'मार्क्सवादी' नव्हते !

मार्क्सच्या मृत्यूनंतर त्याच्या शिष्यगणांपैकी थोडेच जण त्याच्या चिकित्सापद्धतीवर निष्ठा ठेवून राहिले. उलट, ज्या मार्क्सवाद्यांनी इतिहास घडविला त्यांनी, मार्क्सने भाकीत केलेल्या परिस्थितीच्या अगदी विरुद्ध परिस्थितीत मार्क्सवादी क्रांति प्रत्यक्षात घडवून आणण्यासाठी, त्याच्या भविष्यवाणीचा (Prophecy) आणि सिद्धान्ताच्या साक्षात्कारी स्वरूपाचा (Apocalyptic aspects) उपयोग करून घेतला. आणखी असेही म्हणता येऊ शकेल की, मार्क्सची भविष्यवाणी हा जसजसा अधिकाधिक श्रद्धेचा विषय बनू लागला, तसतसा त्याची भाकीते (Predictions) आणि वस्तुस्थिति यांच्यातील विरोध प्रगट होऊ लागला. कारण स्पष्ट आहे. भाकीते ही अल्पमुदतीची, नजिकच्या कालाची असल्यामुळे त्यांच्यावर ताबा ठेवणे शक्य होते. पण, भविष्यवाणीची कार्यप्रवृत्ति दीर्घमुदतीवर आधारलेली असते आणि सर्व धर्मांच्या सामर्थ्याचे उगमस्थान असे जे अप्रामाण्य, असिद्धत्व तेही या भविष्यवाणीचे एक वैशिष्टय असते, भाकीते खरी होईनात, तेव्हा भविष्यवाणी हेच एकमेव आशास्थान राहिले. परिणामतः आपल्या इतिहासावर तिचेच अधिराज्य चालू राहिले. भविष्यवाणीच्या दृष्टिकोनातूनच मार्क्सवादाची समीक्षा करावी लागेल,





अनुक्रमणिका

## मार्क्सच्या इतिहास-सिद्धाताचे प्रतिगामी स्वरूप

मार्क्स हा एकाच वेळी 'बुर्झ्वा' (Bourgeois) तसाच क्रांतदर्शी (Revolutionary) ठरतो. क्रांतिकारी म्हणूनच तो अधिक सुपरिचित आहे. पण, त्याच्या क्रांतिकारी द्रष्टेपणातील बऱ्याच गोष्टींचा अर्थ त्याच्या 'बुर्झ्वा' द्रष्टेपणामुळे लागतो. क्रांतिकारी मार्क्सचा वैचारिक पिंड, त्याच्या 'बुर्झ्वा' वैचारिक पिंडापासून बनलेला आहे. ऐतिहासिक व शास्त्रीयदृष्ट्या ख्रिश्चन व 'बुर्झ्वा' विचारसरणीतून उगम पावलेल्या प्रेषितवादाचा (messianism), त्याच्या क्रांतदर्शी प्रेषितवादावर प्रभाव पडला. आणि हा क्रांतदर्शी प्रेषितवाद जर्मन विचारप्रणाली (Ideology) व फ्रान्सची बंडखोर वृत्ति यातून उगम पावला होता.

प्राचीन जगाशी तुलना करता ख्रिश्चन व मार्क्सवादी वैचारिक जगताची एकता व साधर्म्य आश्चर्यजनक आहे. या दोन तत्त्वप्रणालींचा जगद्विषयक समान दृष्टिकोन दोहोंनाही प्राचीन ग्रीक विचारप्रवृत्तीपासून दुरावणारा आहे. जेस्पर्सने (Jaspers) मोजक्या शब्दात हे चांगले स्पष्ट केले आहे. "मानवाचा इतिहास अगदी अनन्य, अद्वितीय (Unique) असा आहे, हा विचार ख्रिश्चन विचारपद्धतीनुसार आहे." मानवी जीवन आणि घटनांचा क्रम म्हणजे एका निश्चित आद्यापासून निश्चित अंताप्रत विकास पावणारा इतिहास आहे; आणि या मार्गानेच मानवाला मुक्ति वा शासन मिळत असते, हा विचार ख्रिश्चनांनीच प्रथम मांडला. ग्रीक मनाला विस्मयजनक वाटणाऱ्या ख्रिश्चन दर्शनातूनच इतिहासाचे तत्त्वज्ञान (Philosophy of history) जन्म पावले. उत्क्रांतीची ग्रीक कल्पना आणि इतिहासाच्या उत्क्रांतीची आपली कल्पना यात समान भूमिका अशी नाहीच. दोहोतील अंतर वर्तुळ आणि सरळ रेषा यांच्यातील फरकासारखे आहे. जगाचा इतिहास हा चक्रनेमिक्रमासारखा (Cyclical) आहे, अशी ग्रीकांची कल्पना आहे. मध्यसामुद्रिक प्रदेशात शिरकाव करून घेण्याकरितां ख्रिश्चन तत्त्वप्रणालीला ग्रीक तत्त्वप्रणालीचे संस्कार परिधान करावे लागले (Hellenize) आणि यामुळे ख्रिश्चन तत्वप्रणालीचे स्वरूप अधिक लवचिक बनले. पण, प्राचीन जगताला इतिहासवाद व दंडनीति (Idea of punishment) या नूतन कल्पनांची ओळख करून देण्यात ख्रिश्चन धर्मप्रणालीची कल्पकता व विचारनाविन्य दिसून येते. ख्रिश्चन धर्मप्रणालि ही प्रेषितत्वाच्या बाबतीत (Concept of Mediation) ग्रीक आहे. तर, इतिहासवादाच्या बाबतीत ती ज्यूवादी (Judaic) आहे.

इतिहासवादाच्या बाबतीत ख्रिश्चन व ग्रीक तत्वप्रणालीच्या दृष्टिकोनाचा फरक समजावून घेण्याकरिता, ऐतिहासिक विचारपद्धतींचा निसर्गविषयक दुजाभाव जाणून घेणे आवश्यक आहे. या विचारपद्धतींनुसार निसर्ग हा चिंतनाचा (Contemplation) विषय नसून परिवर्तनाचा (Transformation) विषय आहे. ख्रिश्चन धर्मप्रणालीनुसार, तसेच मार्क्सवादाच्या मतेही, निसर्ग ताबा गाजविण्याकरिता आहे; ग्रीकांच्या मते निसर्गाचे आज्ञापालन अधिक श्रेयस्कर. मूळ ख्रिश्चन धर्मियांना प्राचीन पूर्वजांच्या विश्वप्रेमाची ओळखही नव्हती; उलट, विश्वप्रलयाची ते अधीरतेने वाट पहात होते. ग्रीक विचारसरणीचे संस्कार जडलेल्या ख्रिश्चन धर्मप्रणालीने अल्बिजेन्सियन पाखंडाचा फुलोरा फुलविला. पण, धर्मपीठाचे पाखंडोच्छेदक मंडळ (Inquisition) स्थापन होऊन हे पाखंड नष्ट पावल्यावर, ख्रिश्चन धर्मपीठाने पुनश्च इहलोक व निसर्गसौंदर्य यांच्याकडे पाठ फिरविली निसर्गाला खाली खेचून इतिहासाला पूर्वप्रतिष्ठा प्राप्त करून दिली. "इहलोकाचे जे सार म्हणून आहे, जो पुरुषार्थ आहे तो क्रमा-








क्रमाने काढून घेऊन, इहलोक त्यापासून रिता करणे ही खिश्चन धर्मप्रवृत्ति आहे ... कारण, सार हे संज्ञांच्या समूहात ( Conglamoration of symbols ) वास करते म्हणून. " – जेस्पर्सची ही उक्ति सार्थ आहे. कालप्रवाहातून सतत प्रगट होणाऱ्या ईश्वरीलीला, दिव्यनाट्य ( drama of divinity ), म्हणजेच या संज्ञा. निसर्ग हा केवळ या नाट्याचा पार्श्वदेखावा. मानव्य आणि निसर्ग यामधील नाजुक समतोलपणा ( equilibrium ), मानवाचा निसर्गाविषयी संमतिदर्शक आदर, यांच्यामुळे प्राचीन विचारप्रणालीला एक प्रकारचे दिव्यत्व व प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. इतिहासवादाच्या हिताखातर, हे दिव्यत्व, ही प्रतिष्ठा, खिश्चन धर्मप्रणालीने धुळीस मिळविली. येशु खिस्ताचे देवत्व ( Divinity ) नाकारण्यात येऊन, एक अवतारी पुरुष, मानवी देव ( man–god ) ही संज्ञा रूढ झाली. प्रेषितत्वाची ( mediation ) कल्पना नाहीशी झाली आणि ' ज्यूवादी ' ( Judaic ) जग फिरून अवतरले. दुराराध्य संग्रामदेवतेचे राज्य सुरू झाले, सुखलोलुपतेचे उगमस्थान म्हणून सौंदर्याची हेटाळणी होऊ लागली; निसर्गाच्या पायात दास्यशृंखला अडकल्या.

वरील दृष्टिकोनातून पाहता, मार्क्स इतिहासरूपी ईश्वराचा जेरेमि ( Jeremiah ) आणि क्रांतीचा सेंट ऑगस्टीन ठरतो. या विवेचनातून मार्क्सच्या सिद्धान्ताचे जे प्रतिगामी स्वरूप आहे ते विशद होते. हे आणखी सिद्ध करावयाचे झाल्यास, मार्क्सचा एक समकालीन, प्रतिगामी विचारप्रणालीचा चतुर सिद्धान्ति जोसेफ द मायस्त्र याच्याशी केलेली तुलना उद्बोधक ठरेल.

## मार्क्स आणि मायस्त्र

इतिहासाचे खिश्चन तत्वज्ञान पुरस्कृत करण्यास्तव, मायस्त्रने तत्कालपूर्व तीन शतकातील अत्यंत हीन विचार म्हणून जॅकोबिनवाद व कॅलविनवाद यांचे खंडन केले. भेदप्रवृत्ति व पाखंड यांना विरोध करण्यासाठी, त्याला खऱ्याखुऱ्या कॅथॉलिक चर्चची ' शिवणीशिवाय कफनी ' ( the robe without a seam ) पुनर्निर्मित करावयाची होती. खिश्चन विश्वनगरी ( Universal Christian City ) निर्माण करणे त्याचे ध्येय होते. तो ॲडमच्या–विश्वमानवाच्या–पुनरुत्थापनाचे स्वप्न पाहात होता. मायस्त्रच्या कल्पनाशक्तीतून निर्माण झालेल्या लौकिक व पारलौकिक जेरुसलममध्ये, " सर्व नगरवासीयांची मने एकाच वृत्तीने व्याप्त असतील, ते एकदिलाने नांदतील, एकमेकात भरून असतील आणि एकमेकांचे सुख प्रतिबिंबित करतील. " " दुष्टत्वाचा समूळ नाश झाल्यावर वासना व स्वार्थ याचा अंत होईल. " " माणसातील द्वैत नष्ट होऊन तो एकरूप होईल."

निरपेक्ष ज्ञानाच्या (absolute knowledge) नगरीत, मनःचक्षु व देहचक्षु एकरूप होतात, म्हणून हेगेलनेसुद्धा विसंगतीचा समन्वय साधला. परंतु, मायस्त्रचे स्वप्नरंजन फिरून मार्क्सशी जुळते आहे. सारसत्व आणि अस्तित्व ( essence & existence ), स्वातंत्र्य आणि गरज ( freedom & necessity ) यांच्यामधील संग्रामाचा शेवट होणार असल्याची घोषणा मार्क्सही करतो. मायस्त्रच्यामते १७८९ ची फ्रेंच राज्यक्रांति भावी धार्मिक क्रांतीची दहशत बसविणारी प्रस्तावना होती आणि तो या धार्मिक क्रांतीची आतुरतेने वाट पाहात होता. ' नष्ट केलाच पाहिजे असा मानवजातीचा अखेरचा शत्रु म्हणजे मृत्यु ' सेंट पॉलच्या या उक्तीची मायस्त्र पुनर्घोषणा करतो. त्याच्या मतानुसार पृथ्वीतल एक भव्य वेदी असून, या वेदीवर साऱ्या जीवनाचा, अनंत, असीम, अविश्रान्तपणे, कालान्तापर्यंत, दुष्कृताचा नाश होईपर्यंत, मृत्यूला मरण येईपर्यंत, बळी दिलाच पाहिजे. मार्क्सच्या बाबतीत अशाच प्रकारचा सर्जनशील दैववाद ( creative fatalism ) आढळतो. मायस्त्र प्रचलित समाज-








व्यवस्थेचे समर्थन करतो. मार्क्सने तत्कालीन समाज-व्यवस्थेचे समर्थन केले आहे. भांडवलशाहीची सर्वोत्कृष्ट व वक्तृत्वपूर्ण प्रशंसा, भांडवलशाहीचा सर्वात कट्टर शत्रु कार्ल मार्क्स यानेच केली आहे. जेव्हा ती कालविरोधी व टाकाऊ होते, तेव्हाच त्याचा भांडवलशाहीला विरोध आहे. साधनांच्या बाबतीत देखील मार्क्स व मायस्त्र यांच्यात साधर्म्य आहे.

वरील साधर्म्यामुळे मायस्त्र मार्क्सवादी होत नाही की मार्क्स पारंपरिक खिश्चन ठरत नाही. मार्क्सचा नास्तिकवाद निरपेक्ष आहे. तरीपण, त्याने परमसत्तेची ( Supreme being ) फिरून प्रतिष्ठापना केली आहे. या दृष्टिकोनातूनच, समाजवाद हा मानवाचे देवत्वीकरण ( deification ) करण्याचा साहसी प्रयत्न ठरतो आणि यामुळेच, परंपरागत धर्मांची काही वैशिष्ट्ये त्याने धारण केली आहेत. खिश्चन धर्ममूलक, क्रांतिवादी धरून साऱ्या ऐतिहासिक घोषितवादांची ही समन्वयप्रवृत्ति ( Reconciliation ) सूचक आहे. फक्त संज्ञा ( Symbols ) तेवढ्या निराळ्या. मायस्त्र असो वा मार्क्स असो, कालान्तानंतर लांडगा व कोकरू यांचा समेट घडून येतो; खुनी आणि खुनाला पडलेला बळी, एकाच वेदीवर येऊन नांदतात; इहलोकावर स्वर्ग अवतरतो. मार्क्सच्या दृष्टीने, इतिहासाचे नियम आधिभौतिक वास्तवतेचे प्रतिबिंब आहे; तर, मायस्त्रच्या दृष्टीने ते ईश्वरी वास्तवतेचे प्रतिबिंब आहे. मार्क्सच्या बाबतीत, जड ( Matter ) हेच सार ( Substance ) आहे; तर, मायस्त्रच्या दृष्टीने, ईश्वराचे आत्मतत्व इथे भूतलावर अवतरले आहे. हे जड आणि हे अध्यात्म अनाद्यनन्ताच्या ( eternity ) प्रारंभी दुरावलेले विभक्त असतात. पण इतिहासाचे सिद्धान्त वास्तववादी अशा निश्चित सिद्धान्ताप्रत ( Realistic Conclusion ) पोहोचल्यानंतर त्यांचे पुनर्मीलन घडवून आणतात आणि इतिहाससमाप्ति होते.

मायस्त्र हा ग्रीसचा द्वेष्टा होता. तो म्हणत असे की, ग्रीसच्या भेदप्रवृत्तीचा वारसा पुढील पिढ्यांनी चालविल्यामुळे युरोप भ्रष्ट झाले. मार्क्सलासुद्धा ग्रीसचा तिटकारा होता; पृथ्वीतलावरील कोणत्याही प्रकाराचे सौंदर्य त्याला परके ( alien ) वाटत असे. तसे म्हटले तर ग्रीक विचारसरणी खरोखर ऐक्यप्रवृत्तीची द्योतक होती. खिश्चन विचारसरणीने कल्पिलेल्या आणि आज, धार्मिकतेचा मूलाधार तुटल्यामुळे, युरोपीय जीवनाला भेडसावणाऱ्या समुदायवादी ( Totality ) ऐतिहासिक प्रवृत्तीची ग्रीसला जाणीवही नव्हती. " अशी कोणती कल्पित कथा आहे, असा कोणता पागलपणा आहे, असा कोणता दुर्गुण आहे की, ज्यांना ग्रीक नामाभिधान नाही, ग्रीक चिन्ह नाही की ग्रीक मुखवटा नाही " –ग्रीसची अशा तऱ्हेची भावनातिरेकी हेटाळणी आधुनिकतेची प्राचीन जगताशी परकेपणाने वागण्याच्या प्रवृत्तीची द्योतक आहे. तसेच, खिश्चन धर्मप्रणालीत पवित्र म्हणून जे जे काही आहे, ते भ्रष्ट करून एका नवीन आक्रमक प्रवृत्तीच्या चर्चेची उभारणी करणारा, सत्तालोलुप, हुकूमशाही प्रवृत्तीचा समाजवाद ( Socialism ) त्यात अनुस्यूत आहे.

## मार्क्सवाद आणि इतिहासाचे पुरोगामित्व

मार्क्सच्या शास्त्रीय आधिभौतिकवादाचे वा जडवादाचे ( Scientific Materialism ) मूळच मुळी ' बुर्झ्वा ' विचारसरणीत आहे. प्रगति ( progress ), विज्ञानाचे भवितव्य, तंत्रविज्ञान ( Technology ) व उत्पादनपद्धतीचे स्तोम व त्यावरील निष्ठा, या साऱ्या गोष्टी ' बुर्झ्वा ' भाकडकथा ( myths ), पुराणे आहेत आणि १९ व्या शतकात त्या वेदवाक्य ( dogma ) होत्या. मार्क्सचा कम्युनिस्ट जाहिरनामा ' ( communist manifests ) आणि रेनाँ- ( ( Renan ) चे ' विज्ञानाचे भवितव्य, ' हे दोन ग्रंथ एकाच साली प्रसिद्ध झाले, ही घटना अर्थपूर्ण व सूचक आहे.

ही श्रद्धा गोंधळात टाकणारी असली, तरी उद्योग-धंद्यांचा विकास आणि विज्ञानाची आश्चर्यजनक प्रगति यांच्यामुळे १९व्या शतकात गूढ असा जो आशावाद उंचावला होता, त्याची योग्य कल्पना देणारी आहे. हा आशावाद 'बुर्झ्वा' समाजाचाच आशावाद होता आणि हाच समाज शेवटी तांत्रिक प्रगतीच्या फायद्याचा वाटेकरी होणार होता.

पुरोगामित्वाची ( Progress ) ही ज्ञानविज्ञान-युग ( Age of Enlightement ) आणि भांडवलशाही क्रांति ( Bonrgeois Revolution ) यांना समकालीन आहे. तत्पूर्व कालातही काही उगमस्थाने सापडू शकतील. पण, या नवीन श्रद्धेचे लक्षण प्रथम टर्गोटने ( १७५० ) निश्चित केले. 'मानवी मनाची प्रगति' या प्रबंधात तो म्हणतो, "अखिल मानवजात ही, कधी शांतता तर कधी प्रक्षुब्धता, कधी सुकृत तर कधी दुष्कृत अशा आळीपाळीने, जड पावलाने का होईना, अधिकाधिक पूर्णत्वाकडे प्रगत होत आहे." तांत्रिकविज्ञानप्रगतीमुळे होणारी भरभराट आणि तदनुषंगिक ऐहिक सुखे भोगण्यास आतुर असलेल्या मानव समाजाला अगदी साजेसे नी मानवणारे तत्वज्ञान म्हणजे प्रगमनशीलतेचे तत्वज्ञान होय- हे सॉरेलचे मत निखालस बरोबर होते. उद्यांची ददात नाही, आजच्यापेक्षा उद्या अधिक सुख आहे, अशी जेव्हा खात्री दिली जाते, तेव्हा आपण निवांतपणे, आनंदाने जगू शकतो. भविष्यकालाच्या शाश्वतीची विश्वसनीय हुंडी धन्याची सदसद्विवेकबुद्धि स्वच्छ ठेवते. गुलामगिरीत वा दुःखमय जीवनात खितपत पडलेल्यांना, स्वर्गातील सद्गतीचा भरंवसा वाटत नाही अशांना, भविष्यकाल तुमच्याच हाती आहे अशी खात्री दिली जाते. भवितव्यता हीच अशी एक मालमत्ता आहे की जी मालक गुलामाला आपखुषीने मंजूर करून टाकतो.

वरील विचार आजही कालविसंगत नाहीत. कारण, क्रांतदर्शी प्रवृत्तीने पुरोगामित्वाचा हा संदिग्ध व सोयीचा विचार फिरून उचलला आहे अर्थातच, प्रगतीची तऱ्हा जरा वेगळी आहे. भांडवलशाहीच्या बुद्धिवादी आशावादाची मार्क्स पुरती हेटाळणी करू शकत नाही. बुद्धिविषयक ( Reason ) त्याच्या कल्पना जरा वेगळया आहेत. तरीपण, समन्वयाच्या भवितव्यतेकडे नेणारी दुष्कर प्रगति, मार्क्सचे तत्संबंधी विचार निश्चित करणारी आहे. इतिहासाच्या आशावादी दृष्टिकोनाचा सरळ मार्ग प्रकाशमान करणारी जी काही औपचारिक मूल्ये होती, ती हेगेल व मार्क्सवादाने नष्ट करून टाकली. पण, इतिहासाची आगेकूच, इतिहासाचे पुरोगामित्व ही कल्पना मात्र त्यानी जतन करून ठेवली. आणि या कल्पनेचा सामाजिक प्रगतीशी संबंध जोडून गोंधळ उडविला. अशा रीतीने, १९ व्या शतकातील 'बुर्झ्वा' विचारप्रणालीने घालून दिलेल्या मार्गावरूनच त्यांची पुढील वाटचाल चालू राहिली. मार्क्सच्या विचारावर प्रभाव पाडणारा टोक्युविल ( Tocqueville ) गंभीरपणे जाहीर करतो की, "समतेचा संथ पण प्रगमनशील विकास म्हणजेच मानवाचा भूतकालीन व भविष्यकालीन इतिहास होय." 'समते' ऐवजी 'उत्पादनाची पातळी' ( level of production ) ही शब्दयोजना करा की मार्क्सवाद झालाच !

## मार्क्स आणि ऑगस्त कॉम्त

या उत्क्रांतीच्या आवश्यकतेचे निश्चित व पद्धतशीर प्रतिपादन फ्रेंच तत्वज्ञ ऑगस्त कॉम्त ( Auguste Comte ) याने केले आहे. कॉम्तचे सिद्धान्त शास्त्रीय समाजवादाने स्वीकारलेल्या सिद्धान्तांशी आश्चर्यकारकरीत्या जुळतात. कॉम्तचे 'पॉझिटिविझम' ( Positivism ) हे तत्वज्ञान १९व्या शतकातील वैचारिक क्रांतीचे पडसाद उमट-

विणारे तत्वज्ञान आहे. मार्क्स त्या क्रांतीचा एक दर्शनकार होता. परंपरेने इतिहासाच्या प्रारंभी कल्पिलेल्या ' गार्डन ऑफ ईडन, ' ' साक्षात्कार ' ( Revelation ) या घटना, या क्रांतीने इतिहासाचा शेवट म्हणून कल्पिल्या आहेत. अध्यात्मिक युग व ब्रह्मज्ञानात्मक युग यांच्यामागून निश्चितपणे येणारे ' पॉझिटिविझम 'चे युग, जणु मानवधर्माची नांदी ठरणार होते. ईश्वराचा अंशही नसलेल्या मानवाचा शोध ही कॉम्तची मनीषा होती. निरपेक्षाच्या जागी सापेक्ष स्थापित करणे कॉम्तचे मूळ ध्येय होते. पण, परिस्थितिनुसार या ध्येयाचे रूपांतर सापेक्षाचे देवत्वीकरण आणि अलौकिकत्वहीन ( without transcendence ) व वैश्विक ( Universal ) अशा नवीन धर्माचा उपदेश यात झाले. कॉम्तला जॅकोबिन बुद्धिवादात ' पॉझिटिविझम 'ची बीजे दिसली आणि १७८९च्या क्रांतिकारकांची गादी आपणच पुढे चालविणार असे त्यास न्यायरीत्या वाटले. सैद्धान्तिक अलौकिकत्व बाजूस सारून, त्याने ही क्रांति पुढे चालविली, तिचे क्षेत्र व्यापक केले आणि पद्धतशीरपणे मानवधर्माचा पाया घातला. " धर्माखातर ईश्वराला बाजूस सारा " – त्याच्या या सूत्राचा अर्थ हाच आहे. एका नवीन धर्मवेडाची मुहूर्तमेढ रोवून, त्याला या नवधर्माचा सेंट पॉल व्हावयाचे होते आणि रोमन कॅथॉलिकवादाच्या ठिकाणी पॅरिस कॅथॉलिकवादाची प्रतिष्ठापना करावयाची होती. प्रत्येक खिश्चन मंदिरात, ईश्वराच्या वेदीवर देवपण प्राप्त झालेल्या मानवतेच्या पुतळ्याची उभारणी करावयाची होती. नॉटर डॅममध्ये १८६० पूर्वी ' पॉझिटिविझम 'ची प्रवचने सुरू होतील याचे त्याने अचूक भाकित केले.

## नवे धर्मवेड

आणि हे भाकितखरे ठरले. १९व्या शतकाच्या उत्तरार्धात या नवीन मानवधर्माच्या उपदेशाला फलदायक सुरुवात झाली. कॉम्त न वाचताही, मार्क्स या धर्मोपदेशकांपैकी एक होता अलौकिकत्व ( Transcendence ) अंतर्भूत नसलेल्या धर्माला राजकारण म्हणणे योग्य, हे मार्क्सला चांगले समजले होते. कॉम्तलासुद्धा याची जाणीव होती. तो जाणून होता की, आपला नवीन पंथ म्हणजे मुख्यत:, राजकीय वास्तववाद ( Political realism ), व्यक्तिगत हक्कांवर गदा आणि अनियंत्रित जुलूमशाही ( Despotism ), या गोष्टी अभिप्रेत असलेला सामाजिक मूर्तिपूजेचा एक प्रकार. या नवीन समाजव्यवस्थेत शास्त्रज्ञ ( Scientist ) नवधर्मोपदेशक असतील, बारा कोटी युरोपीय जनतेवर दोन हजार बँकवाले व तंत्रविज्ञानविशारदांचा अंमल जारी असेल. या अंमलाखाली खाजगी जीवन सार्वजनिक जीवनाशी पूर्णपणे एकरूप झालेले असेल. आचार, विचार, भावना, या बाबतीत सर्वश्रेष्ठ धर्मोपदेशकांच्या आज्ञा शिरसावंद्य पाळल्या जातील. असे हे कॉम्तचे चालू युगातील सर्वंकष युगधर्माची घोषणा करणारे कल्पनारम्य स्वप्न ( Utopia ) होते. विज्ञानाच्या ज्ञानप्रकाशदायी प्रभावाविषयी खात्री असल्यामुळे, कॉम्त पोलिसदलाचा बंदोबस्त करण्यास कदाचित् विसरला असेल. पण, इतरेजन अधिक व्यवहारी असतील; मानवजातीच्या रक्तावर आणि यातनावर या नवीन मानवधर्माचा पाया घातला जाईल.

मार्क्सच्या भविष्यवाणीचे ( Prophecy ) अंतरंग बुर्झ्वा आहे या मतप्रतिपादनाला पुष्टी म्हणून आणखी एका विचाराची भर घालावी लागेल. मानवजातीच्या विकासात औद्योगिक उत्पादनाची भूमिका महत्वाची आहे, हा विचार मार्क्सने बुर्झ्वा अर्थशास्त्रज्ञांकडून उसना घेतला. श्रममूल्याच्या सिद्धान्ताची ( Theory of work value ) आवश्यक तत्वे त्याने रिकार्डो या बुर्झ्वा औद्योगिक क्रांतीच्या अर्थपंडिताकडूनच घेतली.












वरील तौलनिक विवेचन एवढ्याकरिताच की, मार्क्सचे धर्मवेडे भक्त समजतात त्याप्रमाणे मार्क्सची भविष्यवाणी, त्याचा ऐतिहासिक नियतिवाद, म्हणजे मानवी इतिहासाच्या आदि आणि अन्ताची कुंडली नव्हे ! उलट, मानवी निसर्गप्रवृत्तीचा मार्क्स वाटेकरी आहे. आद्यप्रवर्तक ( Pioneer ) असावयाच्या आधी तो वारसदार ( Heir ) आहे. त्याचे सिद्धान्त विज्ञानधर्माचा ( Religion of science ) काल, डारविनच्या उत्क्रांतिवादाचा काल, बाष्पयंत्राचा काल, कापडधंद्याचा काल– या कालापुरतेच वास्तववादी होते. तदनंतर शंभर वर्षांचा काल लोटला आहे. विज्ञानशास्त्रात सापेक्षता ( Relativity ), अनियति, अनिश्चितता ( Uncertainty ), या तत्वांची भर पडली आहे. अर्थशास्त्राला विद्युत्‌विज्ञान, धातुशास्त्र, अणुविज्ञान, यांची दखल घ्यावी लागेल, मार्क्सवाद या शोधांशी समरस होण्यास असमर्थ ठरला आहे. शंभर वर्षांपूर्वीची तत्त्वे ( Truths ) कालाबाधित आहेत हा मार्क्सवाद्यांचा दुराग्रह मार्क्सवाद शास्त्रीय ( Scientific ) असल्याची बढाई हास्यास्पद ठरविते. १९ व्या शतकातील प्रेषितवाद, मग तो बुझ्वा असो वा क्रांतदर्शी असो, या आधुनिक विज्ञानाचा आणि इतिहासाचा विकास रोखू शकला नाही.

— अपूर्ण

* अल्बेर कामूच्या ' रेवेल ' या ग्रंथावरून.
















श्री. पन्नालाल सुराणा

# संरक्षणाची तयारी व देशाची आर्थिक स्थिति

[ फेब्रुवारी महिन्यात केंद्र व राज्य सरकारांची अंदाजपत्रके प्रसिद्ध होतील. मार्च महिन्यात सबंध देश-भर अंदाजपत्रके व देशाची आर्थिक स्थिति यावर चर्चा चालू राहील. गेल्या वर्षापासून या चर्चेत संरक्षण-तयारीच्या निकडीची जाणीव ठेवली जात आहे. येत्या मार्चमध्ये होणारी चर्चा समजण्यास व देशापुढील प्रमुख आर्थिक प्रश्नांबाबत मत बनविण्यास साह्य व्हावे म्हणून काही पार्श्वभूमिवजा टिपणे या लेखाद्वारे दिली आहेत. लेखकाने स्वतःची मते यात मांडलेली नाहीत. ती नंतरच मांडली जाऊ शकतील. – लेखक ]

२० ऑक्टोबर १९६२ रोजी चीनने भारतावर मोठ्या प्रमाणावर लष्करी हल्ला केला. त्यामुळे १९६२-६३ च्या अंदाजपत्रकात काही बदल करावे लागले. संरक्षणासाठी रु. ३७२ कोटीची असलेली तरतूद रु. ५०५ कोटीपर्यंत पुरवणी अंदाजपत्रकाच्या रूपाने वाढवावी लागली.

## संरक्षणासाठी जादा खर्च

यापुढे संरक्षणासाठी बऱ्याच अधिक प्रमाणावर खर्च करावा लागणार हे उघड झाले. भूदल दुप्पट करणे, त्याला आधुनिक शस्त्रे व इतर सामग्री पुरविणे, विमान-दलातील मनुष्यबळ व विमानतळ वगैरे सामग्री दुपटीने वाढविणे, सुपरसैनिक विमाने मोठ्या संख्येने तयार करण्यासाठी आवश्यक ती उत्पादनव्यवस्था करणे ही संरक्षणतयारीची नजीकच्या भविष्यकाळातील उद्दिष्टे ठरविण्यात आली. यासाठी दरवर्षी किमान खर्च पुढील प्रमाणे करावा लागणार आहे :

| | रु. कोटी |
|---|---|
| (१) मनुष्यबळ (त्यांचे खाणे, कपडे, वगैरेसह) | १७० |
| (२) पेट्रोल, तेले इ. | ५० |
| (३) शस्त्रसामग्री, वाहने, दळणवळणाची साधने इ. | १८० |
| ( पैकी रु. ५० कोटी परदेशी सामग्रीसाठी ) | |
| (४) रस्ते, विमानतळ, इमारती, कारखाने इ. | १५० |
| (पैकी रु. ५० कोटी परदेशी सामग्रीसाठी) | |
| एकूण | ५५० |

दरवर्षी रु. ५५० कोटी संरक्षणासाठी जादा खर्च करावे लागतील. त्यापैकी १०० कोटी परदेशी सामग्री वगैरे घेण्यासाठी लागणार आहेत. म्हणजे तितक्या अधिक परकीय चलनाची गरज लागणार. तेवढी रक्कम मदत म्हणून मिळाली तर प्रश्न सोपा होईल. तसे होईल अशी आशा सर्वानाच वाटते आहे. म्हणजे अंतर्गतरीत्या दरवर्षी ४५० कोटींचा अधिक खर्च संरक्षणासाठी करावा लागणार आहे.

## संरक्षण व तिसरी योजना यांचा खर्च

याचा अर्थ असा की तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या १९६३ ते ६६ या तीन वर्षाच्या कालावधीत रु. १३५० कोटी अधिक खर्च करावे लागणार. तिसऱ्या योजनेवरील एकूण खर्च १०,९०० कोटींचा ठरला होता. त्यापैकी १०,४०० कोटी कसे उभे करायचे हे नियोजन मंडळाने दिग्दर्शित केले होते. ५०० कोटी कसे उभे करायचे हा प्रश्न अनिर्णित ठेवण्यात आला होता. पण जर तिसऱ्या योजनेतील उद्दिष्टे गाठायची असतील तर १०,९०० कोटी खर्च करणे आवश्यक आहे हे उघड आहे. नोव्हें. १९६३ मध्ये नियोजन मंडळाने जाहीर केले की भाववाढीमुळे तिसऱ्या योजनेचा खर्च ६०० कोटींनी वाढणार आहे. म्हणजे तिसऱ्या योजनेच्या एकूण कालखंडात–

| | |
|---|---|
| १०,९०० | |
| ६०० | भाववाढीमुळे |
| १,३५० | संरक्षणासाठी |
| १२,८५० | |

याप्रमाणे एकूण रु. १२८५० कोटींचा खर्च करावा लागणार. यापैकी आणखी काही भाग परकीय मदतीतून भागवावा व काही बाबींवरील खर्चात बचत करावी अशी नॅशनल कौन्सिल फॉर अप्लाईड इकॉनॉमिक रीसर्च ( एन्. सी. ए. ई. आर. ) या संस्थेने सूचना केली आहे. त्या संस्थेच्या मते हे आकडे पुढीलप्रमाणे असू शकतील—

| | रु. कोटी |
|---|---|
| ( १ ) परकीय मदत | |
| ( अ ) संरक्षणासाठी गुंतवणूक | १५० |
| ( ब ) संरक्षणासाठी चालू खर्च | १५० |
| ( क ) तिसरी योजना | १५० |
| | ४५० |
| ( २ ) बचत | |
| ( अ ) गुंतवणूक खर्च | १०० |
| ( ब ) चालू खर्च | १०० |
| | २०० |








ही बचत करण्यासाठी वरील संस्थेने पुढील मार्ग सुचविले आहेत– (१) ज्या क्षेत्रात गुंतवणूक : उत्पादन हे प्रमाण कमी आहे अशा क्षेत्रांतील उत्पादन वाढविणे ( उदा०, शेतीत कमी भांडवल लागणाऱ्या विकासयोजनांवर भर देणे ) ( २ ) दीर्घकालीन गुंतवणुकीचे प्रकल्प लांबणीवर टाकणे ( उदा०, काही सामाजिक सुखसोयी, पाणीपुरवठ्याच्या मोठ्या योजना इ. ) ( ३ ) उद्योगधंद्यांची सध्या कमी वापरली जाणारी शक्ति पूर्ण प्रमाणात वापरणे.

अशा प्रकारे बचत करणे शक्य आहे असे गृहीत धरले तर तिसऱ्या योजनेच्या राहिलेल्या कालावधीतील खर्च तेवढ्या प्रमाणात कमी होईल. याप्रमाणे खर्च कमी झाला तर तिसऱ्या योजनेच्या एकूण कालखंडात पुढीलप्रमाणे पैसा उभारावा लागेल.

| | रु. कोटी |
|---|---|
| (१) अंतर्गत– | |
| (अ) तिसऱ्या योजनेतील गुंतवणूक | ४,३५० |
| (ब) संरक्षणासाठी | ३०० |
| (क) तिसऱ्या योजनेतील चालू खर्च | १,१०० |
| (ड) संरक्षणाचा ,, ,, | १,०५० |
| | ६,८०० |
| (२) परकीय मदत– | |
| (अ) तिसऱ्या योजनेसाठी | २,३५० |
| (ब) संरक्षणासाठी | ३०० |
| | २,६५० |

एकूण ( १ + २ ) = ९,४५०

( **टीप**– भाववाढीमुळे जो ६०० कोटींने खर्च वाढणार आहे त्याचा विचार एन्. सी. ए. इ. आर. ने केलेला नाही. ) ९४५० कोटींपैकी सरकारला तिसऱ्या योजनेसाठी ५,४५० कोटी ( आधीचा आकडा ५,३०० कोटी ) व संरक्षणासाठी १,३५० कोटी असे मिळून रु. ६,८०० कोटी खर्च करावे लागणार. यापैकी राज्य व केंद्र सरकारांनी १९६१-६२ व ६२-६३ या दोन वर्षांत मिळून रु. २३४६ कोटी उभारले आहेत. म्हणजे राहिलेल्या तीन वर्षांसाठी रु. ४,४५४ कोटी उभारायला हवेत. १९६३-६४ च्या अंदाजपत्रकात राज्य व केंद्र सरकारांनी मिळून रु. १२४७ कोटी उभारले आहेत. ते पुढीलप्रमाणे—

| | कोटी रु. |
|---|---|
| चालू उत्पन्नांतील बचत | १२० |
| रेल्वेकडून वसूल | २४ |
| सार्वजनिक उद्योगातील नफा | ६५ |
| लोकांकडून कर्जे | २२० |
| अल्पबचत | १०५ |
| प्रॉव्हिडंट फंड, स्टील इक्वलायझेशन फंड, वगैरे, | १६५ |
| नवी करवाढ ( अ ) केंद्र | २५१ |
| ( ब ) राज्ये | ११६ |
| तुटीची तरतूद ( deficit financing ) | १८१ |
| | १२४७ |

म्हणजे १९६४–६५ व ६५-६६ या दोन वर्षांत रु. ३२०७ कोटी उभारण्याची गरज आहे. वर म्हटल्याप्रमाणे एन्. सी. ए. इ. आर. ने ६८०० कोटींचा आकडा ठरविताना भाववाढीमुळे जादा लागणारे ६०० कोटी हिशोबात धरले नाहीत. भाववाढ विशेष जाणवणार शेवटच्या दोन वर्षांतच. म्हणजे आता राहिलेल्या दोन वर्षात वास्तविक ३८०० कोटींची तरतूद करावी लागेल.

तिसरी योजना किरकोळ काटछाट सोडून पूर्वी ठरविल्याप्रमाणे पूर्ण करायची व संरक्षणासाठी वर निर्देशिल्याइतका अधिक खर्च करायचा असा इरादा असेल तर देशातले बचतीचे प्रमाण वाढविणे आवश्यक आहे. १९६०–६१ साली बचतीचे प्रमाण ८·५ टक्के होते ते १९६४–६५ व ६५–६६ साली अनुक्रमे ११ व १२ टक्क्यांपर्यंत वाढवायला हवे. बचतीचे प्रमाण वाढविण्यासाठी कर्ज उभारणी व करवाढ करणे हे उपाय सरकारला अवलंबावे लागणार हे उघड आहे. पण त्याचबरोबर राष्ट्रीय उत्पन्नही पुरेशा प्रमाणात वाढले पाहिजे. नाहीतर त्या उपायांचा एकतर उपयोग होणार नाही, त्यातून पुरेसा पैसा उभारता येणार नाही; किंवा आवश्यक तेवढा पैसा कसेही करून उभारायचाच असे ठरविले तर लोकांच्या उपभोगावर फार मोठ्या मर्यादा घालाव्या लागतील. तिसऱ्या योजनेच्या काळात सरासरीने दरवर्षी ६ टक्क्याने राष्ट्रीय उत्पन्न वाढायला पाहिजे होते. पण १९६१-६२ साली ते २·२ टक्क्यांनी व ६२–६३ साली २·७







टक्क्यानी वाढले आहे असे नियोजन मंडळाने प्रसिद्ध केले आहे. म्हणजे ६३–६४ ते ६५–६६ या तीन वर्षात ते सरासरीने ८·५ टक्क्यांनी वाढायला हवे.

बचतीचे प्रमाण वाढविताना उपभोगावर त्याचा परिणाम होणारच. तिसऱ्या योजनेच्या काळात दर डोई उपभोगात १७ टक्क्यानी वाढ होईल अशी अपेक्षा होती. पण आता बचतीचे प्रमाण वाढवायचे असेल तर ही वाढ जास्तीत जास्त ११·५ टक्क्यापर्यंत होऊ देता येईल. प्रत्यक्ष वस्तूंचा विचार करता संरक्षणाच्या तयारीसाठी लागणाऱ्या व ज्यांची निर्यात वाढवायची आहे अशा वस्तूंचा उपभोगासाठीचा पुरवठा कमी करावा लागणार. आयातीचे प्रमाणही कमी करावे लागेल; त्याचाही उपभोग्य वस्तूंच्या पुरवठ्यावर परिणाम होईल. उपभोग्य वस्तूंचा पुरवठा पुरेसा वाढणार नाही, व गुंतवणूक आणि संरक्षण यावरील खर्च वाढणार; त्यामुळे भाववाढ मोठ्या प्रमाणावर होण्याची शक्यता आहे. ती रोखण्याची पुरेशी प्रभावी तरतूद केली पाहिजे.

बचत खुषीने किती होईल व करवाढीच्या मार्गाने किती करायला लावायची हा प्रश्न आहे. प्रत्यक्ष करांचे प्रमाण काही प्रमाणात वाढविणे शक्य आहे. इन्कमटॅक्स व सक्तीची बचत हा एक भाग झाला. सुपर प्रॉफीटस् टॅक्स बसविणे व वाढविणे शक्य आहे. ते आवश्यकही आहे, कारण त्याशिवाय उत्पादनखर्च कमी करण्यासाठी उद्योगपति प्रयत्न करणार नाहीत.

अप्रत्यक्ष करांचे प्रमाणही काही अंशी वाढवावे लागेल. पण त्या बाबतीत कांही व्यवधाने सांभाळणे आवश्यक आहे. अप्रत्यक्ष कर हा अंतिम स्वरूपात तयार झालेल्या वस्तूंवर (final product) असावा. म्हणजे उत्पादक वस्तूंवर (उदा० डिझेल तेल) कर बसविला जाऊ नये. चैनीच्या वस्तूंवर कर बसविणे अधिक योग्य होय; कारण त्यामुळे त्यांचा उपभोग व पर्यायाने उत्पादन कमी होऊन अधिक आवश्यक वस्तूंच्या उत्पादनाकडे उत्पादनशक्ति वळेल. निर्यातवाढीला प्रोत्साहन मिळेल अशीही दृष्टि ठेवावी. या संदर्भात दरमहा रु. १३० पेक्षा कमी उत्पन्न असणाऱ्या माणसांच्या संसाराला लागणाऱ्या वस्तूंवर मुळीच कर बसविले जाऊ नयेत अशी सूचना एन्. सी. ए. ई. आर. ने केली आहे.

पैसा उभारणीबाबत एन्. सी. ए. ई. आर. ने केलेल्या कांही सूचना पुढीलप्रमाणे आहेत: केंद्र सरकारने अबकारी कर व इन्कम टॅक्स वगैरे सारख्या करात वाढ करण्याबरोबरच बँकेतर्फे दिली जाणारी कर्जे व जाहिराती यांच्यावर कर बसवावेत. त्यांतून दरवर्षी १० कोटींपेक्षा अधिक उत्पन्न होऊ शकेल. इन्कम टॅक्स व तत्सम कर दरवर्षी सुमारे २०० कोटींचे चुकविले जातात असा एक अंदाज आहे. हे थांबविण्यासाठी प्रयत्न झाला पाहिजे व करणे शक्य आहे. राज्य सरकारांनी जमीनमहसुलाची पद्धति बदलली तर त्यांतून सुमारे ५० कोटीचे अधिक उत्पन्न दरवर्षी मिळू शकेल. विजेवरील कर व बटेरमेंट लेव्ही काही प्रमाणात वाढविणे शक्य आहे. सेल्सटॅक्स चुकविण्याविरुद्ध वा वसुलीतील दिरंगाईविरुद्ध उपाययोजना केली तर आणखी ४० कोटी मिळू शकतील आणि दारूबंदी उठवली तर दरवर्षी ३० ते ५० कोटींचे उत्पन्न वाढेल. (शिवाय पोलीसखात्यावरील खर्चांत बचत होईल ती वेगळी.)

संरक्षणाच्या तयारीच्या दृष्टीने अर्थव्यवस्थेच्या वेगवेगळया विभागांचाही विचार करावा लागेल. शस्त्रसामग्री, अन्नधान्य, कपडा व वाहतुकीची साधने या लष्कराच्या गरजा संपूर्णतया अंतर्गतरीत्या भागविता आल्या पाहिजेत व विकासकार्यक्रमांसाठी आवश्यक त्या उत्पादक वस्तूंचे उत्पादनही अंतर्गतरीत्याच झाले पाहिजे. त्या दृष्टीने उद्योगधंद्यांच्या विकासाकडे लक्ष द्यायला हवे. इंजिनिअरिंग व तत्सम उद्योगांवरील ताण वाढेल. लष्करवाढीमुळे अन्नधान्याची गरज वाढेल. भारतात दरमाणशी १५ औंस अन्नधान्य खाल्ले जाते. पण लष्करात दर माणशी २४ औंसाचे रेशनिंग आहे. त्यामळे अन्नधान्याची लष्कराची गरज सुमारे साडे तीन लाख टनांनी वाढणार आहे. वाहतुकीची साधने, वीज वगैरे सारख्यांसाठीही लष्कराची मागणी वाढेल, ती पुरविली पाहिजे. तिसऱ्या योजनेतील कार्यक्रमांची अमलबजावणी करताना या सर्व गोष्टी लक्षांत ठेवल्या पाहिजेत.

---








प्रा. स. रा. गाडगीळ

# प्राचीन भारतातील भौतिकवाद[१] : ३ :

" Those who, without quitting their bodies have attained to new ones through the influence of Hara and Gauri (Mercury and Mica), are to be praised as *Rasasiddhas* ... The ascetic, therefore, who aspires to *liberation in this life* should first make to himself a glorious body."[२]

तंत्रसाधना ही मुळात कृषिविषयक यातुक्रिया (magical rite) असली पाहिजे हे या पूर्वीच्या लेखात आपण पाहिले. हजारो वर्षांपासून लोकायत परंपरेत रूढ असलेले मंत्रतंत्रात्मक विधि आणि तांत्रिकांचे विधि एकच असावेत हे आनंदगिरींनी आणि गुणरत्नाने वर्णिलेल्या लोकायतिकांच्या धार्मिक आचारावरून स्पष्ट होते. प्रस्तुत लेखात तांत्रिकांच्या देहवादाचा आणि त्यातून विकसित झालेल्या भारतीय विज्ञानाचा विचार करावयाचा आहे. तांत्रिकांचा देहवाद आणि भारतीयांचा वैज्ञानिक दृष्टिकोन हे लोकायतपरंपरेशी कसे निगडित आहेत हेही पाहणे उद्बोधक ठरेल.

## तंत्रोपासनेचे अतिप्राचीनत्व

उपलब्ध तंत्रग्रंथ जरी सहाव्या-सातव्या शतकानंतरचे असले तरी तंत्रोपासना ही वेदकाळाइतकीच प्राचीन आहे. सिंधुसंस्कृतीमध्ये[३] तंत्रसाधनेचे अवशेष विपुल सापडत असल्याने या साधनेची मध्यवर्ती कल्पना निदान ५००० वर्षांइतकी प्राचीन आहे हे मान्य करावे लागते. तंत्रसाधना ही मूळची भारतातीलच की बाहेरून आलेली, या प्रश्नाचा नंतर चिनी तंत्रसाधनेच्या संदर्भात विचार करूच; परंतु या पद्धतीने तंत्रोपासनेचे रहस्य समजणे शक्य नाही. विशिष्ट भौतिक परिस्थितीत मंत्रतंत्रात्मक यातुविद्येचा उदय आणि विकास होत असतो हे मान्य केल्यास वरील प्रश्नाला फारसे महत्त्व देता येत नाही. तरी देखील तंत्रोपासना भारताबाहेरून येथे आली असे म्हणण्यापेक्षा, हजारो वर्षांपूर्वीच्या मागसलेल्या भौतिक परिस्थितीत वन्य आणि प्राथमिक कृषिजीवन जगणाऱ्या Tribal समाजात या मंत्रतंत्रात्मक यातुक्रियेची जोपासना झाली असे मानणेच अधिक सयुक्तिक होईल. प्राथमिक समाजातील भूमीच्या सुफलीकरणाचे मंत्रतंत्रात्मकविधि आणि तांत्रिकांचा वामाचार-कामाचार यांमध्ये कोणताही भेद नाही हे आपण पाहिले आहे.[६] या मंत्रतंत्रात्मक विधींचे भौतिक रहस्य समजून घेण्यानेच तंत्रसाधनेचा उलगडा होणार आहे.

## तंत्रसाधना आणि बौद्ध धर्म

वामाचारप्रधान तंत्रसाधना भारताबाहेरून येथे आली हे सिद्ध करण्याचा जसा एक प्रयत्न होत असतो, तसाच ही साधना महायान बौद्ध पंथातून विकसित झाली असेही सिद्ध करण्याकडे काही संशो-

---

१. या मालेतील पहिला व दुसरा लेख 'नवभारत' : जाने. १९६४ व 'फेब्रु.' १९६४ या अंकात प्रसिद्ध झाले आहेत.

२. रसहृदय.

३. नवभारत फेब्रु. १९६४

४. आनंदगिरींनी शांकरदिग्विजयात उच्छिष्ट गाणपत्यांचे केलेले वर्णन. १४ व्या शतकातील गुणरत्न नावाच्या जैन ग्रंथकाराने लोकायतिकांचे 'कामाचार' वर्णिले आहेत : दासगुप्ता– H. I. P. III 533.

५. मार्शल, डॉ. कोसंबी, प्राणनाथ या संशोधकांनी सिंधुसंस्कृतीमधील 'तांत्रिक' अवशेष दाखवून दिले आहेत.

६. नवभारत : फेब्रु. १९६४

धकांचा कल दिसून येतो. बौद्ध धर्माच्याँ माध्यमातून ही साधना तिबेट आणि महाचीन ( चीन ) या देशातून भारतात आली असे हे मत आहे. बौद्ध धर्माच्या परिभाषेमध्ये लिहिलेले अनेक तंत्रग्रंथ उपलब्ध आहेत हे खरे आहे. शून्यता, करुणा, प्रज्ञा, उपाय, वज्र, पद्म, यांसारख्या संज्ञा आणि निर्वाणप्राप्तीसाठी या साधनेने सांगितलेला मार्ग यांवरून बौद्ध धर्माशी तंत्रसाधनेचा घनिष्ठ संबंध असावा असे वाटू लागते. ' प्रज्ञोपायविनिश्चयसिद्धि ' या बौद्ध ग्रंथांत सांगितलेला प्रज्ञोपायविधि म्हणजे तांत्रिकांचा स्त्री-पुरुष संयोगच होय. प्रज्ञा ( स्त्रीतत्त्व ) आणि उपाय ( पुरुषतत्त्व ) यांच्या संयोगातून महासुखाची प्राप्ती होते; अंतिम सत्याची म्हणजेच निर्वाणाची अनुभूति येण्यासाठी ' महामुद्रे'च्या ( योगिनी ) आलिंगनसुखाचा आस्वाद घेणे आवश्यक आहे असे मानले जाऊ लागले. " बुद्धत्वं योषिद्योनिसमाश्रितम्" हे या पंथाचे ब्रीदवाक्य बनले. भगवान् बुद्धानेही याच मार्गाने निर्वाणप्राप्ती करून घेतली असे म्हणण्यापर्यंत बौद्ध तांत्रिकांची मजल गेली.[८] तंत्रवाङ्मयामध्ये 'स्त्री-पूजा' या नावाचा अत्यंत बीभत्स प्रकार आढळून येतो. (तांत्रिकांची लतासाधना ) : "... disgusting practices, both obsene and criminal, including incest, are a part of this *puja*, which is looked upon as the 'true heroic behaviour' ( duhkaracharya) of a Bodhisattva as the fulfilment of perfect virtues.[९] या लेखकाच्या मते ही सर्व बीभत्ससाधना म्हणजे बौद्ध धर्माच्या वेषामध्ये व्यक्त झालेली हिंदू शाक्तांची साधना होय. हिंदु धर्माला हीन लेखण्यासाठी केलेला हा दुसऱ्या टोकाचा उपद्व्याप आहे. या पद्धतीने तंत्राचे मूळ स्वरूप समजणे शक्य नाही. हिंदु अगर बौद्ध धर्मकल्पना उत्तरकालीन आहेत. त्या बाजूस सारून तंत्रामधील मध्यवर्ती कल्पनेचा छडा लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे : "Tautrism is neither Buddhist, nor Hindu in origin. It seems to be a religious undercurrent originally independent of any abstruse metaphysical speculation, flowing on from an abscure point of time in the religious history of India.[१०]" हे दासगुप्तांचे उद्गार गृहीत धरून तंत्राच्या मुळाशी जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

महायान पंथाच्या उदात्ततत्त्वांचा असा अधःपात कशामुळे झाला असावा या प्रश्नाचा विचार करताना म. म. हरप्रसादशास्त्री यांनी काही कल्पना सुचविल्या आहेत. त्यांच्या म्हणण्याचा सारांश असा : " Buddhism, as it spread among the *masses*, it got contaminated with all the superstitions dross that was already prevalent among them. From being the noble religion of the Selfless ascetic, it became the creed of the *vulgar craftsmen and other common folks.*" यातील लोकजीवनाचा उल्लेख महत्वाचा आहे. तंत्रोपासनेमधील वामाचाराचा संबंध, मागसलेल्या लोकसमूहात प्रचलित असलेल्या कृषिविषयक मंत्रतंत्रात्मक विधींशी कसा असतो हे या पूर्वी आपण विस्ताराने पाहिले आहे. भूमीचे सुफलीकरण हेच त्यांचे उद्दिष्ट असते. " Agricultural magic rests on the principle that the productivity of nature — of the female earth-can be induced or enhanced by the imitation or contagion of the human reproductive function. Conversely, human fertility is viewed as dependent on natural fertility."[११] भूमीचे सुफलीकरण यशस्वी करण्यासाठी विधियुक्त स्त्री-पुरुषसंयोगाची आवश्यकता आहे हीच प्राथमिक मानवाच्या धार्मिक

७. The History and Culture of Indian People : B. V. B. Vol. V.

८. E. of Religion of Ethics : L. de La Valle Poussin.

९. Obscure Religious Cults As Background of B. Literature : **Dasgupta.**

१०. लोकायत ३३३ देविप्रसाद चटोपाध्याय.

११. 'अभ्रकस्तव बीजं तु मम बीजं तु पारदः । अनयोर्मेलनं देवि, मृत्युदारिद्र्यनाशनम् ।। – **रसहृदय**








श्रद्धांची मध्यवर्ती कल्पना. उत्तर काळात विविध धर्मग्रंथांच्या तात्त्विक आवरणाखाली हीच स्त्री-पुरुष-संयोगकल्पना विविध रूपात आणि विविध संज्ञांमध्ये प्रगट झाली. शैव तंत्रात शिव आणि शक्ति, वैष्णव तंत्रात कृष्ण आणि राधा अथवा रास आणि रति आणि बौद्ध तंत्रात प्रज्ञा आणि उपाय अथवा वज्र आणि पद्म यांच्या संयोगाच्या परिभाषेत ती व्यक्त झाली. किमयाप्रधान ( alchemical ) तंत्रात पारा आणि अभ्रक यांचा रासायनिक संयोग हर आणि गौरी यांच्या वीर्य-रजसंयोगाच्या परिभाषेत प्रगट होतो :

" Mica is thy seed and Mercury is my seed. The combination of the two, O Goddess, is destructive of death and poverty, " [१२]

तांत्रिकांची ही वामाचारकल्पना मुळात कोणत्याही धर्मांच्या पारलौकिक कल्पनांशी मुळीच संबंधित नव्हती. उत्तरकाळात या कल्पनेमागील यातुविधींचे महत्त्व नाहीसे झाल्यावर त्यावर निरनिराळ्या धार्मिक कल्पनांचे आवरण जडले. अर्वाचीन काळात काही पंडितांनी बौद्ध अगर हिंदू धर्मकल्पनांचा अधिक्षेप करण्यासाठी या कल्पनेचा ( वामाचारयुक्त मंत्रतंत्र ) उपयोग केला; आणि इतर काहींनी वामाचारातून अद्वैतानुभूतीचा शोध घेण्याचा अपूर्व प्रयत्न केला. हे सर्व अनैतिहासिक प्रयत्न बाजूस सारून देवीप्रसाद तंत्राचे मूळ स्वरूप अगदी थोडक्यात पुढीलप्रमाणे स्पष्ट करतात:- " Tantrism is neither Buddhist nor Hindu, but simply agricultural in origin. "

### तंत्रोपासना आणि वर्णजाति

तंत्रातील काही आचारांचे स्पष्टीकरण करताना हरप्रसाद शास्त्री यांनी "...it became the creed of vulgar craftsmen and other common folks. " असे जे उद्गार काढले आहेत ते अगदी वेगळ्याच संदर्भात अर्थपूर्ण आहेत. तंत्रोपासनेमध्ये वर्णजातीच्या उच्चनीचतेला स्थान नाही. उलट अत्यंत हीन समजल्या गेलेल्या जातींनाच या पंथात महत्त्व आहे. राणी मैनावतीला दीक्षा देणारा हाडिपनाथ हा हाडी जातीचा होता. नाथ पंथातील मच्छींद्र, गोरख ही नावे खालच्या समजल्या गेलेल्या जातीतीलच [१३] आहेत. कुब्जिक शाखेतील तंत्र कुंभार जातीत निर्माण झाले आहे. तेव्हा तंत्राचे मूळ स्वरूप ' व्हल्गर क्राफ्ट्समेन ' आणि ' कॉमन फोक्स ' यांच्या जीवनातच सापडू शकेल. बंगालमधील सहजपंथ हा तंत्रपंथच आहे. या पंथाचे आचार हजारो खेड्यांतील शेतकऱ्यांच्या आणि पददलित जनतेच्या जीवनात आजही मूळ स्वरूपात रूढ आहेत. या पंथात हिंदु, मुसल्मान, खिश्चन, बौद्ध यासारख्या विविध धर्मांतील लोक आहेत. येथे धर्मभेदांना आणि जातिभेदांना मुळीच अवसर नाही. सहजपंथाचे आद्य आचार्य सरहपाद[१४] ( ७ वें श. ) यांनी वरिष्ठ वर्णियांविरुद्ध जे वैचारिक बंड पुकारले ते तर अगदी चार्वाकांच्या (लोकायतिकांच्या) भूमिकेवरून ! दोहा कोशातील सरहपादांचे विचार दासगुप्तांनी पुढील शब्दात दिले आहेत. " ... The Brahmins as a caste cannot reasonably be recognised to be the highest of men– for the saying that they dropped from the mouth of Brahma is a myth invented by a section of clever and cunning people; if, on the other hand, a man becomes Brahminr by religions initiation (Samskara ), then ever the lowest of men may be a Brahmin ... "[१५] ब्राह्मणांच्या यज्ञयागादि, पूजा-अर्चादि कर्मकांडाविरुद्ध सरहपादांनी प्रखर

१२. मच्छिंद्रनाथ, गोरखनाथ, यांना भक्तिमार्गी आणि वरिष्ठवर्णीय ठरविण्याचा प्रयत्न होत असतो. हे तांत्रिकच होते; आणि त्यांच्या नावात त्यांच्या जातींचा उल्लेख स्पष्ट आहे.

१३. वज्रयानी बौद्ध पंथातून सहज पंथाची स्थापना करणारे सहजयोगी. ज्ञानेश्वर, कबीर आदि उत्तरकालीन संतांच्या वाङ्मयावर सरहपादांच्या विचारसरणीचा खोल परिणाम झाला आहे. ज्ञानेश्वरांची गुरुपरंपराच सरहपादापर्यंत दाखविता येते.

१४. O. R. C. दासगुप्ता.

१५. कामवज्रयानी तांत्रिकांचे मत.







टीका केली आहे. चार्वाकांच्या लोकायतपरंपरेमध्येच निर्माण झालेले हे विचार आहेत. लोकायतिकांच्या इहलोकपर मंत्रतंत्रात्मक विधीमधूनच तत्रोपासनेचा विकास झाला असला पाहिजे या विचाराला उपोद्बलक असाच हा पुरावा आहे.

## तांत्रिकांचा देहवाद

तांत्रिकांचा देहवाद, त्यांच्या विश्वनिर्मितीविषयक कल्पनेतूनच (cosmogony) उदयाला आला. विश्वाची निर्मिति मानवाप्रमाणेच कामप्रेरणेतून झालेली आहे;[१६] आणि म्हणून मानवदेव आणि विश्व यांमध्ये एकरूपता आहे. ''ब्रह्मांडे ये गुणाः सन्ति ते तिष्ठन्ति कलेवरे " हाच तांत्रिकांचा पिंड–ब्रह्मांड-वाद.'[१७] मानवी देहाचे रहस्य समजून घेण्यानेच विश्वाचे रहस्य समजू शकेल या श्रद्धेवरच त्यांच्या देहतत्त्वाची उभारणी झाली आहे. देहामधील सुप्त शक्तींचा विकास करता आल्यास विश्वातील सर्व रहस्ये हस्तगत करता येतील असा त्यांचा सिद्धांत आहे. " According to the Tantras, since the Universe and the human body are made according to the same principles and composed of the same materials, and since the same forces operate in the same manner within both – by developing the forces inherent in the body, you can have the forces of the universe in your favour, under your control. "[१८] तांत्रिकांच्या कायासाधनेचे हेच रहस्य आहे. ही कायासाधना उत्तरकालीनांनी आध्यात्मिक बनविली असली तरी मुळात पूर्णपणे इहलोकवादीच आहे. सहजवैष्णवपंथीय तांत्रिकांच्या गीतांमधून या कायासाधनेचे महत्त्व अतिशय उत्कटतेने वर्णिले आहे. बोस यांनी दिलेल्या गीतांपैकी एक पुढीलप्रमाणे आहे: " Here (within this body) is the Ganga and the Yamuna, here the Gangasagar, Prayag, kashi; here the Sun and the Moon. Here are all the secred places– The Pithas and the Upapithas. I have never seen a place of pilgrimage and an abode of bliss as perfect as my body. "[१९] हे शरीरमाहात्म्य अध्यात्मिक स्वरूपाचे असावे असे काही संशोधकांना वाटते. स्वतः दासगुप्ता[२०] यांनीही ही कायासाधना अध्यात्ममार्गा-वरची पायरी आहे असेच म्हटले आहे. परंतु तांत्रिकांचे स्वतःचे मत याहून भिन्न आहे. त्यांची मुक्तीची कल्पनाच पूर्णपणे इहलोकवादी आहे.[२१] " Liberation is declared in the six systems as subsequent to the death of the body, and upon this there can be no reliance and consequently no activity to attain to it free from misgivings.

Such liberation is not cognised in perfection like an embelic fruit in hand. Therefore a man should preserve that body by means of mercury and

१६. ' Human body is the microcosm of the Universe.'

१७. बंदोपाध्याय. ( रचनावलि )

१८. O. C. R. १०४ दासगुप्ता.

१९. " Though the truth is within the body and arises out of it, it should never be confused to be something physical. " – O. R. C. 104

२०. " इति धनशरीरभोगान्मत्वा नित्यान् सदैव यतनीयम् ।
मुक्तौ सा च ज्ञानात्तच्चाभ्यासात्स च स्थिरे देहे ॥ " – गोविंदभगवत्पादाचार्य

२१. ' षड्दर्शनेऽपि मुक्तिस्तु दर्शिता पिण्डपातने ।
करामलकवत्सापि प्रत्यक्षा नोपलक्ष्यते ॥
तस्मात्तं रक्षयेत्पिण्डं रसैश्चैव रसायनैः ॥ ' – रसार्णव.








medicaments....[२२] तांत्रिकांनी कायासाधनेतून शरीरविज्ञान (ॲनॅटॉमी), रसायनशास्त्र आणि औषधिविज्ञान (Pharmaceutical Technique) यांची देणगी भारतीय विज्ञानाला दिली. हा देह 'अमर' करण्यासाठी त्यांनी संशोधन केले. योगविद्या आणि पारा, गंधक, सुवर्ण, अभ्रक, यांची रसायने तांत्रिकांनीच परिपूर्ण केली. चरक आणि सुश्रुत या आचार्यांना अज्ञात असलेल्या शरीरातील घटना तांत्रिकांनी शोधून काढल्या. मानवी जाणीवेचे केंद्र (seat of consiciousness) हृदयात नसून मेंदूत आहे हे प्रथम यांनीच निश्चित केले.[२३] तांत्रिकांची **शवसाधना** आज कितीही ओंगळ वाटत असली तरी या साधनेमुळेच त्यांना शरीरातील घटना निश्चित करता आल्या. वरिष्ठ उच्च वर्णीयांना शवसाधना वर्ज्य होती.[२४] डोंब, चांडाल, हाडी या जातींच्या तांत्रिकांना शवसाधनेत अधर्म्य काहीच नव्हते. हे सर्व संशोधन आजच्या विज्ञानयुगात अत्यंत प्राथमिक स्वरूपाचे ठरले तरी मध्ययुगात त्यांनी दाखविलेली प्रयोगनिष्ठा आणि प्रस्तापित केलेले सिद्धांत आजही चकित करणारे आहेत. या वैज्ञानिक संशोधनाचे स्वरूप समजून घेण्यापूर्वी तांत्रिकांच्या देहवादातून निर्माण झालेल्या त्यांच्या विश्वनिर्मितिविषयक कल्पनेचे अवलोकन करू. मध्ययुगीन संस्कृतीचे एक महत्त्वाचे रहस्य या कल्पनेत दडलेले आहे. तांत्रिकांची विश्वनिर्मितिविषयक कल्पना (cosmogony) मानवाप्रमाणेच विश्व हेही वामोद्भव– कामोद्भव[२५] आहे ही तांत्रिकांची कल्पना या पूर्वीच आपण पाहिली आहे. प्रकृति आणि पुरुष अगर शिव आणि शक्ति यांच्या संयोगातून या विश्वाची निर्मिति झाली आहे. हा संयोग केवळ प्रतीकात्मक अगर अलंकारात्मक नाही. मनुष्याची कामप्रेरणा आणि वैश्विक कामप्रेरणा (Human erotic urge & Cosmic lust) या एकच क्रिया आहेत. अनेक तंत्रग्रंथांनी या दोनही प्रेरणांचे विस्ताराने वर्णन केले आहे; इतकेच नव्हे, तर वैश्विक कामप्रेरणेला साहाय्यक म्हणून विधियुक्त मैथुनाला (Ritual union) त्यांनी आपल्या साधनेमध्ये महत्त्वाचे स्थान दिले: "In certain Tantras the similarity between, and, in fact, the Sameness of union of Siva (Purusha, the male) and Sakti (Prakriti, the female) on the one hand and that of human male and the female on the other hand is explained in meticulous details– The former accounting for the birth of the Universe, while the latter accounting for the birth of human beings."[२६] पूर्वभारतामधील मध्ययुगीन शिल्पामध्ये साकार केलेल्या मैथुनक्रियेचा अन्वयार्थ याच तत्त्वानुसार लागू शकतो. जगन्नाथपुरी आणि कोणार्क येथील मंदिरांच्या शिखरावर जी प्रचंड मैथुनशिल्पे कोरिली आहेत ती तांत्रिकांच्या कामसाधनेचे प्रतीक म्हणूनच कोरिली आहेत. या शिल्पांचे स्पष्टीकरण करताना बंदोपाध्याय म्हणतात: "According to this sect (Kamavajrayana) the universe is created by *kama* exactly as human beings are... Their ritual practice aims at establishing a harmony between cosmic lust and human lust. They were, therefore, continually indulging in *kama-sadhana* ... They exhibited this lust

२२. कुंडलिनी मस्तकातील सहस्रदलचक्रापर्यंत नेण्याने योग्याला जी समाधि लागते तिचा संबंध मेंदूच्या जाणीव केंद्राशीच आहे हे स्पष्ट होते.

२३. मेडिकल कॉलेजमध्ये (कलकत्ता) शवच्छेदन करावे लागते म्हणून प्रारंभी विद्यार्थी यावयास तयार नव्हते.

२४. वामोद्भवा वसुंधरा.

२५. बंदोपाध्याय (रचनावलि)

२६. ,, ,,



अनुक्रमणिका






on the temples and monasteries.[२७]" या विधियुक्त मैथुनाला प्राथमिक यातुविद्येत किती महत्त्वाचे स्थान आहे हे यापूर्वीच आपण पाहिले आहे. फ्रेजरने याला contagious किंवा sympathetic magic हे नाव दिले आहे.

विधियुक्त मैथुन अथवा कामसाधना हे एखाद्या विशिष्ट धर्माचे अंग नसून, प्राथमिक समाजाच्या मंत्रतंत्रात्मक विधींचे अंग आहे. मध्ययुगीन भारतीय संस्कृतीचा अभ्यास करताना या कामसाधनेचा ऐतिहासिक दृष्टिकोनातून विचार करणे आवश्यक आहे. नाहीतर विधियुक्त मैथुनाचा आणि मंदिरावरील मैथुनशिल्पांचा अद्वैतानुभूतीशी संबंध जोडण्याचा विलक्षण आणि हास्यास्पद प्रसंग ओढवतो.

तंत्रोपासनेचे जे विशेष आतापर्यंत आपण पाहिले, त्यांचे स्पष्टीकरण थोडक्यात पुढील प्रमाणे सांगता येईल: 'लोकजीवनामध्ये (Vulgar Craftsmen and common folks) अत्यंत प्राथमिक अवस्थेपासून प्रचलित असलेल्या 'सुफलीकरण' विषयक यातुक्रियेमधून या साधनेची निर्मिति झालेली असल्याने हीन समजल्या गेलेल्या लोकांना येथे केव्हाही बंदी नव्हती. या 'हीन' वर्णीयांनी वरिष्ठ वर्णीयांविरुद्ध वैचारिक आणि सांस्कृतिक बंड पुकारावे हे स्वाभाविक होते. तांत्रिकांच्या विश्वनिर्मितिविषयक कल्पनेचे अधिष्ठान '**वैश्विक कामप्रेरणा**' हे असल्याने, त्यांची कामसाधना म्हणजे गुणरत्न अगर आनंदगिरी म्हणतात त्याप्रमाणे केवळ स्वैराचार नसून त्या साधनेला यातुक्रियात्मक महत्त्व होते. आणि शेवटी ही यातुक्रिया कोणत्याही परलोकसाधनेसाठी अगर 'आत्म्या'च्या मुक्तीसाठी नसून भौतिक संपन्नता प्राप्त करून घेण्यासाठीच असल्यामुळे या साधनेतून भौतिक शास्त्रांचा विकास व्हावा हेही स्वाभाविकच होते. अर्थात् विशिष्ट मर्यादेपलीकडे येथे भौतिक शास्त्रांचा विकास होऊ शकला नाही याची कारणे अनेक आहेत. परंतु तांत्रिकांचा 'मोक्ष' इहलोकवादीच होता याविषयी शंका बाळगण्याचे कारण नाही.

## तंत्रोपासना आणि चीनमधील 'टाओपंथ'

चीनमधील विज्ञानाचा पाया घालणारा टाओपंथ आणि भारतातील तंत्रपंथ यांमध्ये विलक्षण साम्य आहे. 'सायन्स अँड सिव्हिलायझेशन इन चायना' या आपल्या ग्रंथात नीडहॅमने हे साम्य विस्ताराने दाखविले आहे. तंत्रोपासनेचा भारतीय विज्ञानाशी किती निकटचा संबंध आहे हे पाहण्याच्या दृष्टीने टाओइझमचा थोडक्यात परिचय करून घेऊ.

चिनी तत्त्वज्ञानामध्ये यँग (पुरुषतत्त्व) आणि यिन (स्त्रीतत्त्व) अशी दोन तत्त्वे आहेत. परंतु टाओपंथात 'यिन्' तत्त्वालाच प्राधान्य आहे. त्याच्या वाङ्मयातील Mysterious Feminine म्हणजे तांत्रिकांची 'सहजसुंदरी' अथवा 'त्रिपुरसुंदरी' होय. तांत्रिकांच्या 'योगिनी' अगर 'भैरवी' प्रमाणे टाओपंथातही देवतांच्या पूजाविधीचा अधिकार स्त्रियांकडेच होता. विधियुक्त मैथुनालाही या पंथात 'धार्मिक' महत्त्व होते. तांत्रिकाप्रमाणेच टाओपंथाने वरिष्ठ वर्गाविरुद्ध बंड पुकारले होते. सरंजामदार आणि त्यांचे पुरोहित– Fendal Lords and their ideological spokesmen– याविरुद्ध टाओपंथाने अत्यंत प्रखर भूमिका घेतली आहे. या पंथाचे हे विचार चार्वाक (लोकायतिक) आणि सहजपंथाचे संस्थापक आ. सरहपाद यांच्या विचारांशी पूर्णपणे जुळणारे आहेत. टाओपंथाच्या या क्रांतिकारक राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक विचारांमुळे हा पक्ष नेहमीच प्रतिष्ठित समाजाकडून उपेक्षिला गेला. Vulgar craftman आणि 'common folks') याचाच हा पंथ प्रतिनिधी राहिला.

टाओपंथाची धारणा अतिप्राचीनकाळी चीनमध्ये अस्तित्वात असलेल्या सामूहिक श्रमजीवी जीवनात झाली असली पाहिजे. या काळी तेथील समाज मातृसत्ताक[२८] असावा. या समाजात अद्यापि श्रमजीवी आणि बुद्धिजीवी हे भेदही पडलेले नसावेत. समाजातील सर्वच लोकांचा श्रमाशी संबंध असावा. 'आत्मा' 'मोक्ष', 'परलोक' यासारख्या कल्पनांचा अद्यापि उदय

२७. "...The people were innocent, peaceful and cooperative. They knew Their mothers, but did not know their fathers" चु आंग चौ च्या आधारे.

२८. नीडहॅमः S. C. C. II. 150-1








झालेला नसावा; आणि म्हणूनच या पंथाच्या मंत्रतंत्रात्मक यातुविधींमधून इहलोकपर साधनाच संभवली. material immortality हेच त्यांचे ध्येय होते. मानवी शारीराच्या अमरत्वासाठी त्यांनी जी साधना सांगितली आहे तिच्यामध्ये तांत्रिकांप्रमाणेच प्राणायाम, आसने, नियत आहार, किमया ( alchemy ) आणि विधियुक्त मैथुन यांना महत्त्व आहे. या दोन्ही पंथाची योगसाधना अगदी एकसारखीच आहे. प्रस्तुत विवेचनाच्या संदर्भात किमया आणि विधियुक्त मैथुन यांचाच थोडक्यात विचार करू.

या पंथाचे जे ध्येय – Physical immortality (देहाचे अमरत्व ) त्याला ' hsien–ship = True man (= देहाचे अमरत्व) हे नाव आहे. या ध्येयप्राप्तीसाठी कामाचारी साधना या पंथात सांगितली आहे. या पंथानेही मानवी मैथुनाचा वैश्विक कामप्रेरणेच्या पार्श्वभूमीवरच विचार केला आहे. आनंदगिरींनी अगर गुणरत्नाने वर्णिलेली तांत्रिकाची कामसाधना आणि टाओपंथाची कामसाधना यांमध्ये काहीही भेद नाही. " The most astonishing aspect of this whole department of Taoist philosophical–religions practice ... is that it comprised public ceremonies as well as ordinary conjugal life and private exercises for *hsien–ship Candidates*.'[२९] प्राथमिक Tribal समाजाच्या मंत्रतंत्रात्मक यातुक्रियेतून या विधींची निर्मिति झाली असली पाहिजे हे आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून स्पष्ट होऊ शकेल. तांत्रिकांप्रमाणेच टाओइस्टांच्या या कायासाधनेतून चिनी विज्ञानाचा विकास झाला आहे.

टाओपंथ आणि तंत्रपंथ यामधील हे विलक्षण साम्य पाहून भारतातील तंत्रसाधना चीनमधून भारतात आली असावी असा निष्कर्ष काहींनी काढला आहे. तंत्रसाधनेसारखी बीभत्स साधना वैदिक आर्यांच्या उच्च धर्मकल्पनांमधून उद्भवणे अशक्य आहे अशी कल्पना करून काही प्रतिभावान् संशोधकांनी ही ' व्यभिचार ' साधना मंगोलियन रक्तातून उद्भवलेल्या शाक्यकुलोत्पन्न बौद्ध धर्मातून उत्पन्न झाली असली पाहिजे असा निष्कर्ष काढला आहे.[३०]

नीडहॅमनेही तंत्रोपासना चीनमधूनच भारतात आली असे म्हटले आहे. टाओइझमची विचारसरणी चीनमध्ये दुसऱ्या ते सहाव्या शतकात प्रभावी होती; आणि भारतातील तंत्रांचा काळ त्यानंतरचा असल्याने चीनमधूनच ही आयात झाली असली पाहिजे असे नीडहॅमचे म्हणणे आहे. परंतु हे म्हणणे टिकणारे नाही. लिखित तंत्रवाङ्मय जरी उत्तरकालीन असले तरी तंत्रसाधनेचे धागे सिंधुसंस्कृतीपर्यंत म्हणजे ५००० वर्षांपूर्वीपर्यंत जातात हे मागे आपण पाहिले आहे. लोकायतिक, कापालिक, असुर यांची मंत्रतंत्रात्मक साधना म्हणजेच तंत्रसाधना हे विस्ताराने यापूर्वी आपण पाहिले आहे.[३१] तेव्हा टाओइझम चीनमध्ये दुसऱ्या शतकापासून प्रभावी होता एवढे प्रस्थापित करण्याने ही साधना चीनमधून भारतात आली हे सिद्ध होत नाही. उत्तर काळात बौद्ध धर्माच्या माध्यमातून या दोन साधनांची देवाण-घेवाण झाली नसेल असे म्हणावयाचे नाही. पण सांस्कृतिक देवाण–घेवाण होण्याला समान सामाजिक परिस्थिति असावी लागते. इजिप्शियन आणि ग्रीक संस्कृतीच्या देवाण-घेवाणीची चर्चा करताना थॉमसनने काढलेले पुढील उद्‌गार प्रस्तुत संदर्भात लक्षात ठेवण्याजोगे आहेत. " Religious ideas are borne by trade winds far afield, but they only take root in soils ready to receive them.[३२] "

टाओइझम आणि तंत्रसाधना या दोहोंचाही उगम समान सामाजिक परिस्थितीत झाला असला पाहिजे. " ... The point is that neither Tantrism nor Taoism was a thing in itself. Both must have had their roots in

२९. अ. ज. करंदीकर : अशोक ते कालिदास.

३०. नवभारत : जाने. फेब्रु. १९६४

३१. थॉम्पसन : Aeschylus and Athens.

३२. वाजसनेयी संहिता, शतपथब्राह्मण, सोमयाग, सामदेव समन् इ.



अनुक्रमणिका






the concrete material conditions." ही समान भौतिक परिस्थिति म्हणजे भूमीच्या ( आणि स्त्रीच्या ) सुफलीकरणासाठी मंत्रतंत्रात्मक यातुक्रियेवर दृढ श्रद्धा बाळगणारा प्राथमिक अवस्थेतील Tribal अगर कृषिसमाज होय. ही प्रक्रिया केवळ चीन अगर भारत या देशापुरतीच मर्यादित नसून ती एक सार्वत्रिक स्वरूपाची ( Universal ) घटना आहे. प्राथमिक मानवाच्या अनेक धर्मकल्पना वरील श्रद्धेतून निर्माण झाल्याचे पुरावे जगभर सर्वत्र आढळतात. उत्तर कालात माणसाला जेव्हा भौतिक घटनांमागील कार्यकारणभावांचे ज्ञान होत गेले तसतशी या मंत्रतंत्रात्मक विधींची गरज संपून त्यांना धार्मिक आवरण लाभले. प्रत्येक समाज केव्हा ना केव्हा या मागसलेल्या प्राथमिक अवस्थेत असलाच पाहिजे. वैदिक आर्यांनीही या अवस्थेतील जीवनाचा अनुभव घेतला असला पाहिजे. त्यांच्याही धार्मिक जीवनात मंत्रतंत्रात्मक यातुक्रिया होतीच. आणि या यातुक्रियेत वामाचार–कामाचार[33] यांना स्थान असलेच पाहिजे. आनंदगिरींनी वर्णिलेल्या उच्छिष्ट गाणपत्याप्रमाणे (हा पंथ तांत्रिक आहे) आर्यसमाजामध्येही एके वेळी विवाहसंस्था अस्तित्वात नव्हती.[34] तेव्हा वामाचारयुक्त तंत्रोपासना भारतामध्ये बाहेरून आली असे म्हणण्यात कोणते स्वारस्य उरते ? प्रत्येक प्राथमिक समाजात वामाचार-प्रधान यातुक्रिया असतेच हे मान्य करून या यातुक्रियेचे भौतिक रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तंत्रोपासना आणि टाओइझम यांचा उदय समान भौतिक परिस्थितीत झाला आणि उत्तर कालात तांत्रिक बौद्धांच्या मार्फत या पंथांचा संस्कृतिसंगम सुरू झाला हेच अधिक संभाव्य वाटते.

## तंत्रोपासना आणि विज्ञान

तांत्रिकांचा आणि टाओइस्टांचा इहलोकवादी दृष्टिकोन विज्ञानाला पोषक ठरला. यांच्या मंत्रतंत्रात्मक अभिचार विद्येतून ( Magic ) किमया आणि रसायनशास्त्र यांची निर्मिति झाली. मॅजिक आणि विज्ञान यांचा अगदी निकटचा संबंध आहे: "We may detect a germ of modern notion of natural law or the view of nature as a series of events occuring in an invariable order *without the intervention of personal agency.*"[35] भक्ति, पूजा, प्रार्थना या गोष्टी मॅजिक आणि विज्ञान याहून मूलतः भिन्न आहेत. यामध्ये ईश्वराचे कर्तृत्व ( Personal agency ) गृहीत धरावे लागते. फ्रेजरने मॅजिकचा 'next of kin to Science' असा जो उल्लेख केला आहे तो यथार्थ आहे.

टाओइस्टांच्या ध्येयवादातून विज्ञानाचा उदय कसा झाला याचे नीडहॅमने केलेले विवेचन उद्बोधक आहे. दोन्हीही पंथांचा ध्येयवाद ज्याप्रमाणे भौतिक स्वरूपाचा होता, त्याप्रमाणेच दोन्हीही पंथ श्रमजीवी जीवनापासून दुरावलेले नव्हते. शारीर श्रम आणि बौद्धिक श्रम यामध्ये अभेद्य तटबंदी अद्यापि निर्माण झालेली नव्हती. भौतिक जीवनापलीकडे कल्पनानिर्मित मानसिक विश्वामध्ये सत्याचा शोध घेण्याची 'आत्मविद्या' अद्यापि उदयाला आलेली नव्हती. ज्या समाजात बुद्धिमान् लोकांचा भौतिक जीवनाशी आणि श्रमप्रक्रियेशी अविभाज्य संबंध असतो तेथेच भौतिक विश्वाचे गूढ उकलण्याचा प्रयत्न सुरू होतो. उलट ज्या समाजात विश्व हे केवळ मनोनिर्मित स्वप्नवत् मानले जाते तेथे प्रकृतीच्या गतिसिद्धांताचा शोध कसा घेतला जाऊ शकेल ? चीनमध्ये टाओपंथाने सुरू केलेल्या वैज्ञानिक परंपरेला शून्यवादी बौद्धांनी[36] जो विरोध केला ह्याचे रहस्य हेच होय. टाओपंथाची भूमिका या शून्यवादी बौद्धांहून अगदी भिन्न होती. "... at bottom, the artisan and the Taoist stood together in the conviction that the tao was in *natural things* and not something other worldlv and transcendent."[37]

---

३३. महाभारतातील पंडु–माद्रीसंवाद.

३४. फ्रेजर : Golden Bongh 10.

३५. शून्यवादी बौद्ध आणि तांत्रिक बौद्ध यांमध्ये फार महत्त्वाचे भेद आहेत.

३६. नीडहॅम S. C. C.

३७. हा नागार्जुन कोणत्या शतकात होऊन गेला याविषयी वाद आहे. दुसऱ्या शतकातील नागार्जुन हाही बौद्ध पंडित होता आणि 'रसरत्नाकरा'चा कर्ता हाही बौद्धच होता.



अनुक्रमणिका








प्राचीन भारतातील आणि चीनमधील पहिले मोठे वैज्ञानिक तंत्रपंथीय आणि टाओइस्ट होते हे पाहून आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. चीनमधील सातव्या शतकातील सर्वश्रेष्ठ गणिती आणि खगोलशास्त्रज्ञ भिक्षु इ-हिसंग ( I-Hsing ) हा तांत्रिक होता. '**रसरत्नाकर**' या ग्रंथाचा कर्ता सुप्रसिद्ध भारतीय वैज्ञानिक नागार्जुन[३८] हाही तांत्रिक होता. दक्षिण भारतातील वैज्ञानिक विकासाला हातभार लावणारे जे तांत्रिक सिद्ध पुरुष ( Sittars ) होऊन गेले त्यांमध्ये दोघे सिद्ध चिनी तांत्रिक होते. बोगर नावाच्या तांत्रिकाने वैद्यकशास्त्र आणि रसायनशास्त्र यावर तामिळ भाषेत अनेक ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आहे. आपल्या 'हिस्टरी ऑफ केमिस्ट्री इन एन्शंट अँड मेडिएव्हल इंडिया' या ग्रंथात पी. सी. रे म्हणतात : "The Tantrika cult is a curious mixture of alchemical process on the one hand and grotesque and obsene, and sometimes revolting rites on the other." '**रसरत्नाकर**' **रसार्णव, काकचंडेश्वरीमततंत्र, रसेंद्रचूडामणि, रसप्रकाशसुधाकर,**[३९] यासारख्या अनेक तंत्रग्रंथातून औषधिविज्ञान, किमया आणि रसायनशास्त्र यांचे सप्रयोग विवरण आहे. मध्ययुगात नालंदा, उदंतपूर, विक्रमशीला या विद्यापीठात तंत्रसाधनेचा साग्रंत अभ्यासच होत असे. वरील शास्त्रे स्वतंत्र नसून तंत्रसाधनेचे अंग म्हणूनच त्याचा अभ्यास होई. या सर्व शास्त्रांची मांडणी तांत्रिक परिभाषेतच केलेली आढळते. शिव आणि पार्वती अगर हर आणि गौरी यांच्या संभाषणातून हे सर्व शास्त्रज्ञान अवतरते. कित्येक तंत्रांत बुद्ध आणि अवलोकितेश्वर यांचा अवतार होतो. भगवान् बुद्धाचे ठिकाणी सर्व ज्ञानाचा उगम आहे असेही म्हटलेले असले तरी तो रूढ उपचार आहे. प्रत्यक्ष प्रयोगाने आपले निष्कर्ष काढले असल्याचे काही ग्रंथकार स्पष्ट लिहितात. रुद्रयामल तंत्राचा कर्ता म्हणतो : "I have performed the aforementioned experiments with my own hands and have seen them with my own eyes. They are recorded from mere hearsay ..."[४०] रसेंद्रचिंतामणि ग्रंथाचा प्रारंभच पुढील वाक्यांनी होतो. "I shall give publicity only to such process as I have been able to verify by my own experiments ..."[४१]

या तथाकथित अध्यात्मवादी तंत्रग्रंथात प्रयोगनिष्ठ विज्ञानाचा समावेश का केला असावा याचे उत्तर रसार्णवकारानेच देऊन ठेविले आहे. "As it is used by the best devotees for the highest end, it is called Parada[३८]." 'पार-द' शब्दात अभिप्रेत असलेली मोक्षाची कल्पना पूर्णपणे भौतिक आहे. 'Physical immortality' चे साधन म्हणजेच पाऱ्याचे रसायन. पाऱ्याने मिळणारा मोक्ष मरणोत्तर नसून या लोकीच, या देहीच प्राप्त होतो. पारा आणि अभ्रक यांच्या योगे शरीर अमर करणारे ते रससिद्ध योगी होत. या अमृतप्राशनाने ( Elizir of Life ) शरीर अविनाशी बनते. "Mercury is called *Parada* because it is a means of conveyance beyond the series of Transmigratory states [ giver ( da ) of summum bonum ( Para ) = *parada* ][४२] प्राणायाम, आसने इ. योगिक साधनांनी या साधकांना इहलोकीच मोक्ष मिळवावयाचा होता. टाओइस्टांनी अगदी याच साधनांनी *hsien-ship* ( material Immortality ) प्राप्त करून घेण्याचे ध्येय आपल्यापुढे ठेविले होते. यांत कोठेही आत्म्याचा अगर मरणोत्तर मोक्षाचा संबंध येत नाही.

लोकायतपरंपेरमध्ये निर्माण झालेल्या तंत्रोपासनेचे हे मूळ भौतिक स्वरूप नव्या ज्ञानाबरोबर विकसित झाले

३८. पी. सी. रे यांनी अनेक तंत्रांची यादीच दिली आहे.

३९., ४०. } H. C. A. M. I. पी. सी. रे.

४१. 'पारदो गदितो यस्मात्परार्थं साधकोत्तमैः' — 'रसार्णव'

४२. " संसारस्य परं पारं दत्तेऽसौ पारदः स्मृतः " — 'रसार्णव'








नाही. मरणोत्तर-मोक्षसंशोधनाच्या प्रभावाने त्यातील इहलोकवादी विचारसरणी लुप्त झाली; आणि अध्यात्माच्या नावाखाली केवळ ओंगळ आणि बीभत्स स्वैराचार तेवढा मागे राहिला. तंत्रोपासनेचे मूळ भौतिक स्वरूप शोधण्याचा प्रयत्न न झाल्यामुळे मोठ-मोठाल्या पंडितांनी याच स्वैराचारात अद्वैतानुभूतीचा शोध सुरू केला.

मूळ सांख्यांच्या प्रधान-कारणवादी (स्वभाववादी) विचारसरणीमध्ये अध्यात्माची भेसळ करून यापूर्वीच आत्मवाद्यांनी भारतीय भौतिकवादाचा पायाच उखडून टाकला होता. चार्वाकांचा स्वभाववाद विकृत स्वरूपात विरोधकांच्या वाङ्मयात शिल्लक राहिला आणि ही भारतीय भौतिकवादाची शास्त्रशुद्ध परंपरा लुप्त झाली. मध्ययुगात विकृत स्वरूपात अवतरलेल्या तंत्रोपासनेने या परंपरेवर शेवटचा आघात केला. भारतीय भौतिकवादाची आणि मध्ययुगीन सांस्कृतिक जीवनाची ही मोठीच शोकांतिका होय.

---





अनुक्रमणिका








अनु. प्रा. चंद्रप्रभा प्रभु

# भारतातील औद्योगिक प्रगतीचा इतिहास आणि नागरी उद्योगधंद्यांचा युद्धकामासाठी उपयोग *

आजचा विषय ' भारतातील औद्योगिक प्रगतीचा इतिहास आणि नागरी उद्योगधंद्यांचा युद्धकामासाठी उपयोग ' असा विस्तृत नि काहीसा गुंतागुंतीचा आहे की एका भाषणात जास्तीत जास्त मी करू शकेन ते म्हणजे सध्या आपल्यापुढे उभ्या ठाकलेल्या आणीबाणीच्या संदर्भात या विषयावरील माझे विचार आपल्यापुढे मांडणे.

भारतीय औद्योगीकरणाच्या इतिहासाचे निवेदन करणे किंवा काही विशिष्ट उद्योगधंद्यांच्या प्रगतीचा आढावा घेणे आज काही शक्य होणार नाही. त्याबद्दलची माहिती आणि या प्रगतीला ज्या अनेक गोष्टी कारणीभूत झालेल्या आहेत त्यांचे विवेचन कुठेही सुलभतेने मिळण्यासारखे आहे नि म्हणूनच इथे परत त्याची पुनरावृत्ती करून काही विशेष फायदा नाही. साधारणपणे १९ व्या शतकाच्या मध्यापासून भारतात आधुनिक उद्योगधंद्यांना सुरुवात झाली. १८५०-५५ च्या दरम्यान सुती कापडनिर्मिती, तागाचे कापड, कोळशाच्या खाणी, या व अशासारख्या उद्योगधंद्यांना भारतात प्रारंभ झाला, लोहमार्गांना सुरुवात झाली. पहिल्या महायुद्धापर्यंतच्या कालात या क्षेत्रात काहीशी संथ प्रगती चालू होती. युद्धकाळात औद्योगिक प्रगतीला जोरदार प्रोत्साहन मिळाले. पण युद्ध संपले आणि एकप्रकारची स्थिरता, एकप्रकारची मंदी आली. मुख्य मुख्य, अत्यावश्यक उद्योगधंद्यांच्या अभावामुळे आपली पावले औद्योगीकरणाच्या बाबतीत पक्की रोवली गेली नव्हती.

दोन युद्धांच्या मध्यंतरीच्या कालावधीत फिस्कल कमीशनच्या शिफारशीने पोलाद, कापूस, साखर, कागद, आगपेट्या यात बरीच प्रगती करता आली. कारण त्यांना संरक्षण देण्यात आले होते. साखरेच्या नि आगपेट्याच्या बाबतीत आपल्या देशाने स्वयंपूर्णता मिळविलीच, सिमेंटच्या बाबतीत तर संरक्षण नसतानासुद्धा. १९२२-३९ या कालावधीत सुती कापडनिर्मितीत २॥ पटीने वाढ झाली. पोलादनिर्मितीत आठपट तर कागद निर्मितीत २॥ पट वाढ झाली. आपल्याला लागणाऱ्या सिमेंटपैकी जवळ जवळ ९५ टक्के देशातच निर्माण होऊ लागले. आगपेट्या, काचसामान, वनस्पती, साबू या उद्योगधंद्यांच्या क्षेत्रातही लक्षात येण्यासारखी प्रगती घडून आली. विद्युत्उपकरणांच्या तत्संबंधित आणि वस्तूंच्या उत्पादनासही सुरुवात झाली. इतके असूनही १९३६ च्या सुमारास भारताचे औद्योगीकरण झाले असे मात्र म्हणता येत नाही.

युद्धकालात लोखंड नि पोलादाच्या उत्पादनात वाढ झाली. शस्त्रास्त्रनिर्मितीचे कारखाने वाढले, इतर व्यापारी कारखाने नि रेल्वेचे कारखाने यांच्या मदतीने ७०० वेगवेगळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे भारतातच बनविली जाऊ लागली. वेगवेगळ्या प्रकारची यंत्रसामुग्री, कातकामासाठी, विंधण्यासाठी, वापरण्यात येणारी अवजारे, वेगवेगळ्या भट्ट्या वगैरे वस्तूंच्या निर्मितीसाठी कारखान्यांना परवाने देण्यात येऊ लागले. १९४१ मध्ये रासायनिक द्रव्ये व औषधे यांच्या कारखान्यांना सुरुवात झाली. सल्फ्युरिक ॲसीड, सिन्थेटिक अमोनिया, कॉस्टिक सोडा, क्लोरिन, ब्लीचिंग पॉवडर इत्यादींचे उत्पादन देशात होऊ लागले. याचबरोबर औषधे, कातडीसामान, कांचसामान इत्यादी गोष्टींच्या उत्पादनात पण वाढ झाली.

युद्धोत्तरकालात स्वतंत्र भारताचा जन्म झाला; पण उद्योगधंद्यांच्या क्षेत्रात मात्र परिस्थिती या दरम्यान अतिशय गंभीर होती. आपल्या कारखान्यांना आवाक्याबाहेर काम पडले होते. यंत्रसामुग्री झिजून गेली होती, जुनी काढून टाकून त्या जागी नवीन यंत्रे बसवावयास हवी होती, किंवा निदान जुन्याची डागडुजी तरी

* प्रा. गोवर्धन पारीख यांचे कुन्नूर येथील संरक्षणदल कॉलेज पुढील भाषण.








करावयास हवी होती. दूरगामी स्वरूपाचे काही प्रश्न- उदा:– मोठ्या प्रमाणावर उत्पादन, किंवा तांत्रिक वा आर्थिक गोष्टींचा योग्य विचार करून योजनाबद्ध आखणी करणे– संपूर्णपणे दुर्लक्षिले गेले होते. ग्रॅडी मिशनच्या पुढील विधानावरून हेच दिसून येईल. " भारतातील खनिज संपत्ती बव्हंशीकरून वापरण्यात आलेलीच नाही. भारतातले प्रगत उद्योगधंदे व्यापारी तत्वावरच चालविले जात आहेत, आणि युद्धकामासाठी त्यांचा उपयोग करून घेण्यासाठी सरकारकडे साधन नाही. " आजही काहीशी अशीच परिस्थिती आहे म्हटल्यास फारसे वावगे ठरणार नाही. देशाच्या फाळणीबरोबरच कच्चा ताग नि लांब धाग्याचा कापूस निर्माण करणारे प्रदेश पाकिस्तानात गेल्यामुळे उलट सुती कापडनिर्मितीच्या नि तागकामाच्या उद्योगधंद्यावर अतिशयच अपायकारक परिणाम झाला.

स्वातंत्र्योत्तर काळातील प्रगतीच्या पर्वाची सुरुवात १९४८ च्या इंडस्ट्रियल पॉलिसी रिव्हॉल्युशनपासून झाली असे म्हणावयास हरकत नाही. १९४६ ते ५१ या कालावधीत अंदाजे २९० कोट रुपयांचे भांडवल नवीन उद्योगधंद्यात गुंतविले गेले व १२५ कोट रुपयांची यंत्रसामुग्री चालू उद्योगधंद्यात झिजून गेलेली जुनी यंत्रे काढून टाकून त्याजागी बसविण्यासाठी आयात केली गेली. इंडस्ट्रियल पॉलिसी रिव्हॉल्युशनने मात्र हे तेव्हाच स्पष्ट केलेले आहे की ' औद्योगिक प्रगतीसाठी सरकारने अधिकाधिक लक्ष पुरविले पाहिजे' या अनुषंगानेच १९५० मध्ये प्लॅनिंग कमिशनची स्थापना करण्यात आली.

अशाप्रकारे नियोजनबद्ध आर्थिक प्रगतीला सुरुवात झाली. औद्योगिक उत्पादनात पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात ३८ टक्क्यांनी वाढ झाली आणि काही ठराविक लोखंड, पोलाद, ॲल्युमिनियम इत्यादी उद्योगधंदे सोडल्यास इतर क्षेत्रात भांडवल गुंतवणुकीच्या बाबतीत ठेवलेली ध्येये सिद्धीस गेली, व उत्पादन वाढले. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेने मुख्य मुख्य अत्यावश्यक उद्योगधंद्यांवर जास्त भर देऊन आपल्या औद्योगिक प्रगतीसाठी विस्तृत नि भरभक्कम पाया उभारण्याकडे जास्त लक्ष पुरविले. नियोजनकालातील या गोष्टींविषयी अधिक खोलात जाण्याची आवश्यकता आहे असे वाटत नाही. एक गोष्ट मात्र येथे नमूद करावयास हवी व ती म्हणजे दुसऱ्या पंचवार्षिक योजनेखाली आखण्यात आलेली प्रगतीची रूपरेखा आपल्या सध्याच्या परिस्थितीचा विचार करता उपकारकच ठरली आहे. कारण आता आपल्याला एकाचवेळी दोन गोष्टी करावयाच्या आहेत, देशाच्या संरक्षणाची तयारी नि त्याचबरोबर देशाची प्रगती.

आता आपण सध्याच्या परिस्थितीचा विचार करू. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेतही दुसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणेच मूलभूत उद्योगधंद्यांवर भर देण्याचे धोरण ठेवण्यात आलेले असून, यंत्रसामग्रीच्या निर्मितीवर मात्र जास्त भर देण्यात आला आहे. १९६१–६२ सालच्या प्रोग्रेस रिपोर्टमध्ये प्रगति समाधानकारक आहे असे म्हटले आहे. मध्यवर्ती आणि राज्यसरकारांनी हाती घेतलेल्या अनेकविध योजना प्रगतिपथावर आहेत. मात्र अर्थव्यवस्थेवर या सर्वांचा मिळून नक्की परिणाम काय होईल हे एवढ्यातच सांगणे बरोबर होणार नाही. त्याकरिता बराच कालावधी जावयास हवा. खाजगी उद्योगधंद्यांच्या क्षेत्रातही अंदाजे हजार नवीन परवाने वेगवेगळ्या उद्योगधंद्यांकरिता देण्यात आले. पण एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे की सुरुवातीला ठरविलेले एकूण उत्पादनाचे लक्ष्य १९६५–६६ सालापर्यंत गांठावयाचे असेल तर याहून जास्त जोराचे प्रयत्न केले पाहिजेत. पण प्रत्यक्ष परिस्थिती पाहाता, १९६२ सालातील व तदनंतरच्या एकूण घडामोडींमुळे अर्थव्यवस्थेत मंदीची लाट पसरली आहे.

आता देशात युद्धकालीन परिस्थिती नाही, पण तरीसुद्धा शांततामय परिस्थितीही नाही. जर युद्धकाळ असता तर युद्धजन्य गरजांना पहिला मान मिळाला असता, देशातील साधनसामग्री त्याकरता वापरली गेली असती. इतर सर्व गोष्टींना, फार काय लोककल्याणाच्या कार्यक्रमांनासुद्धा दुय्यम स्थान प्राप्त झाले असते. तेच जर शांततामय परिस्थिती असती तर जरुरीपुरता संरक्षणासाठी खर्च करून बाकी सर्व साधने देशाच्या प्रगतीसाठी केंद्रित करता आली असती, लोकांचे जीवनमान वाढविण्याकडे लक्ष पुरवता आले असते. संरक्षणाच्या प्रश्नाकडे जवळजवळ दुर्लक्ष केले गेल्यामुळेच सध्याची



अनुक्रमणिका

परिस्थिती उद्‌भवली आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. आता पहिली गरज आहे देशाच्या संरक्षणाची पूर्णतया तयारी करणे, कुठल्याही प्रकारच्या धोक्याला तोंड देण्याची तयारी ठेवणे. पण त्याचबरोबरच आर्थिक प्रगतीच्या मार्गावरील वाटचाल पण चालू ठेवलीच पाहिजे. ज्या सामाजिक उद्दिष्टांचे ध्येयमंदिर गाठावयाचे आहे त्या रोखाने दौड करताना थांबून चालणार नाही.

सध्याच्या एकूण परिस्थितीचा विचार करता काही कालपर्यंत तरी संरक्षणासाठी तयारी करण्यावरच आपले सर्व लक्ष केन्द्रित करावे लागेल आणि ते अगदी योग्यही आहे. आपण शांततावादी लोक आहोत. स्वातंत्र्य मिळविल्यापासून आपण शांततेसाठीच प्रयत्न केले आहेत. शिवाय आपल्या देशाची आर्थिक प्रगती कशी साधावयाची या प्रश्नाचा विचार करण्यातच आपण गुंतून पडलेलो होतो. आजही या धोरणात मूलभूत असा काहीच बदल झालेला नाही. आता एक जाणीव मात्र पुरेपूर झालेली आहे की आपण शांततेसाठी कितीही प्रयत्न केला तरी आपल्या काही शेजारच्या राष्ट्रांना ते तितकेसे पसंत नाही; आणि त्यामुळे भविष्यकाळातसुद्धा आपल्याला ते आपले अंगीकृत कार्य चालू ठेवू देतील असे वाटत नाही. आणि यामुळेच संरक्षणासाठी तयारी करावयास हवी. ती किती प्रमाणात करावयाची ते आपल्या संभाव्य धोक्याच्या अंदाजावर अवलंबून राहील, आणि धोका फार मोठा नि अतिशय गंभीर स्वरुपाचा आहे. जे लोक या गंभीर परिस्थितीचे महत्त्व कमी लेखण्याचा प्रयत्न करीत आहेत ते जाणूनबुजून गेल्या १५ वर्षाच्या इतिहासाकडे डोळेझाक करीत आहेत असेच म्हणावे लागेल, किंवा त्यामागे त्यांचा काहीतरी विशिष्ट हेतू असला पाहिजे. आपले मूलभूत धोरण शांततावादाचेच राहील नि त्यामुळेच आपल्या युद्धसिद्धतेमुळे तसा धोका, मुख्यतः युद्धाचा धोका निर्माण होण्याचे काहीच कारण नाही.

देशसंरक्षण नि प्रगती यांचा हा असा मेळ आपल्याला घालावयाचा आहे. हुकूमशाही राजवटीत नि आपल्या धोरणात हाच फरक आहे. पहिल्या पद्धतीत देशातील सर्व साधनसामुग्री युद्धासाठी किंवा तदनुषंगिक गोष्टींसाठी वापरण्यात येते. लोकांच्या खालावलेल्या जीवनमानाच्या पायावरच हा सैन्य नि युद्धसामुग्रीचा इमला बांधलेला असतो. सर्वव्यापी नियंत्रणे, वेठबिगारी, राजकीय नि बौद्धिक क्षेत्रातही सरकारी हस्तक्षेप नि सर्वंकषसत्ता या सर्व गोष्टी या पद्धतीत अपरिहार्यपणे येतातच. दुसरीही एक ठळकपणे लक्षात येणारी गोष्ट म्हणजे तावडतोब होणारी अधिकारप्राप्ती. या सर्व गोष्टींच्या आपण सर्वस्वी विरुद्ध आहोत, आपण संरक्षणासाठी तयारी करीत आहोत, युद्धासाठी नव्हे. आपल्याला ज्या परिस्थितीला तोंड द्यावयाचे आहे ती काही आपण निवडलेली नाही पण प्राप्त परिस्थितीला तोंड देऊन विजयी होण्याची सिद्धता मात्र केव्हाही ठेवावयास हवीच.

एक गोष्ट मात्र स्पष्ट केली पाहिजे की सैन्यात वाढ केली, किंवा युद्धसाहित्याचे उत्पादन वृद्धिंगत केले म्हणजेच प्राप्त परिस्थितीला तोंड देण्यास आपण सज्ज झालो असे मात्र नाही. आपल्या शेजारी-राष्ट्रांबरोबरचे आपले संबंध नि जगातील इतर राष्ट्रांबरोबरची मैत्री यांचासुद्धा या सगळ्या गोष्टीत फार मोठा वाटा आहे. आर्थिक साधनांचा योग्य विनियोग हा फक्त या सर्व गोष्टींचा एक भाग आहे.

आता आपण आपल्या एकूण धोरणाच्या इष्टानिष्टतेचा अंतिम साध्याच्या दृष्टीने विचार करू. एका अदमासाप्रमाणे चालू पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात नवीन भांडवल नि संरक्षणजन्य खर्च (निदान १ दशलक्ष लोकांचे शस्त्रसज्ज दळ तयार ठेवण्यासाठी) याकरिता मिळून येणारा ८४५० कोट रुपये खर्च बचतमार्गाने उभा करावयाचा असेल तर बचतीचा वेग ८.५% वरुन १२% पर्यंत वाढविण्यास हवा. याचाच अर्थ असा की संरक्षणाच्या खर्चात वाढ झाल्यामुळे सरकारी खर्चातही ९० टक्यांनी वाढ होणार. यामुळे जरी दर माणशी खर्चात ११.४ टक्यांनी वाढ होणार असली तरी तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या कालात १७% वाढ होईल असा जो अंदाज होता तसे मात्र होणार नाही. देशसंरक्षणासाठी करावा लागणारा त्याग या फरकातून दृग्गोचर होतो.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत जनतेच्या जीवनमानात नक्की कितपत सुधारणा होईल याचा ऊहापोह येथे










करण्याची जरूरी नाही. वाढत्या लोकसंख्येचा विचार करता कदाचित यात उल्लेखण्याजोगा फरक पडणार नाही. शिवाय गेल्या काही वर्षात साचलेल्या डबक्या-सारख्या झालेल्या आपल्या देशातील अर्थव्यवस्थेचा विचारही आपल्याला गंभीर बनविल्याशिवाय राहात नाही.

पण एक गोष्ट खरी. की संरक्षणाकरता करण्यात येणारा जादा खर्च काही अगदीच अनुत्पादक किंवा निव्वळ त्याग करावयास लावणारा आहे असे म्हणता येणार नाही. सध्याच्या आणीबाणीने फक्त आपल्याला आपल्या निवडीत बदल करावयास भाग पाडले आहे. आपल्याला संरक्षणाकरता फक्त थोडा जास्त खर्च करावयाचा आहे आणि त्यामुळे आपोआपच स्वतः-करिता करावयाच्या खर्चात थोडीशी कपात करणे क्रमप्राप्तच होते, आणि थोडे दिवस हे सहन केलेच पाहिजे. कारण त्यामुळेच आपण निदान जरूरीपुरते तरी देशसंरक्षणासाठी सज्ज राहू शकू.

बऱ्याच वेळा असे म्हटले जाते की युद्धाकरता हा जो जादा प्रयत्न आपल्याला करावा लागणार आहे त्यामुळे आपली आर्थिक प्रगती मंदावेल. होता होईल तो आपण असे होऊ दता कामा नये. कारण आपल्या आर्थिक प्रगतीच्या पातळीवरच आपण पुढील भविष्य-काळात देशसंरक्षण कितपत करू शकू हे अवलंबून राहील. आर्थिक विकास हा जसा इतर नागरी गरजा किंवा लोककल्याणासाठी आवश्यक आहे, तसाच देश-संरक्षणासाठीही अत्यावश्यक आहे. आपल्याला आपले अस्तित्व कायम टिकविण्यासाठी नजिकच्या भविष्य-काळात गरजा मारून कमरपट्टे आवळले पाहिजेत व तसे बऱ्याच कालपर्यंत करीत राहिले पाहिजे हे मात्र तितकेच खरे. कुठल्याही परिस्थितीत आपण अशी तयारी ठेवली पाहिजे की, देशसंरक्षणाची पुरेशी तरतूद तर असेलच पण नागरी गरजा नि लोककल्याणाकडेही पुरेसे लक्ष राहील, व या दोन्हीत चटकन् हवातसा बदल करता येईल अशी व्यवस्था ठेवली पाहिजे.

पहिल्या महायुद्धाच्या अंतापर्यंत 'युद्धाचे अर्थ-शास्त्र' म्हणजेच युद्धाकरता लागणाऱ्या पैशाची व्यवस्था करणे असेच गृहीत धरले जाई. पण पहिल्या महायुद्धाच्या वेळची बिकट परिस्थिती आणि त्यानंतर संबंधित अर्थव्यवस्थांवर झालेले परिणाम यामुळे या कल्पनेला जबर धक्का बसला आतापर्यंत हे सर्वमान्य झाले आहे की कुठल्याही देशाला युद्धात मिळणाऱ्या अपयशाचा संबंध केवळ आर्थिक कारणाशी केव्हाही नसतो, तर खरा संबंध इतर साधने म्हणजेच मनुष्य-बळ, यंत्रसामग्री इत्यादींच्या उपलब्धतेशी फार असतो. त्यावरच युद्धाचे भवितव्य अवलंबून असते. दुर्दैवाने भारतापुढे उभ्या ठाकलेल्या या संकटप्रसंगाला तोंड देण्याविषयीच्या सर्व चर्चेत मुख्य भर पैशाची व्यवस्था कशी करावयाची यावरच दिला जातो, व ते बदलले पाहिजे. आपल्या संरक्षणशक्तीचा अदमास घेताना शांततामय काळात हाताशी असलेली साधनसामुग्री संरक्षणकार्याकरिता कशी संयोजिता येईल याचा सांगोपांग ऊहापोह आधी केला पाहिजे.

कुठल्याही देशाची खरीखुरी साधनसामुग्री म्हणजेच नैसर्गिक संपत्ति, कारखाने, लोहमार्ग, रस्ते, गोदामे व या सर्वांना मिळून सर्वसामान्यपणे आपण भांडवल म्हणतो. मनुष्यबळाचा विचार करतो तेव्हा उत्पादन-क्षमता नि त्याचे कसब नि कुशलता ती सुद्धा शास्त्रीय, तांत्रिक, व्यवस्थापनकुशलता अशी वेगवेगळया प्रका-रची. या सर्व गोष्टींच्या उपलब्धतेचा आधी विचार व्हावयास हवा नि नंतर युद्धकार्यासाठी ही साधनसामग्री कशी उपयोजिता येईल याचा विचार करावयास हवा.

प्रत्येक देशाजवळ असलेली अशाप्रकारची साधन-सामुग्री दुसऱ्या राष्ट्राहून भिन्न असते. एखाद्या देशाकडे एक गोष्ट वैपुल्याने असेल तर दुसऱ्या गोष्टीचा तुट-वडा असेल. ज्या गोष्टीची चणचण असते ती गोष्ट जशी विकासमार्गातला अडथळा बनते तशीच इथेही त्रासदायक ठरते. जर झारकालीन रशियामध्ये पहिल्या महायुद्धाच्यावेळी भांडवल नि तांत्रिक ज्ञानाचा तुटवडा भासला असेल तर अमेरिकेला आणि ग्रेट ब्रिटनला मनुष्यबळ अपुरे पडले. योग्य संरक्षणसिद्धतेसाठी या सर्व मर्यादित गोष्टी यथासांग अभ्यासून, शक्य असेल तिथेतिथे त्यांच्यात वाढ करून आणि त्यांचा सुयोग्य वापर केला पाहिजे. भारताला दोन गोष्टी अतिशय महत्वाच्या आहेत. एक भांडवल, नि दुसरे वेगवेगळया शाखातील कसब ( तांत्रिक, व्यवस्थापकीय इत्यादी ... )

लष्करी डावपेच मग ते अर्थविषयक का असेनात राजकीय क्षेत्रातील भावी घटनांशी, मग त्या तर्काच्या








स्वरूपात असल्या तरीही निगडित असतात. युद्धाचा एकूण कालावधि, युद्धाचा प्रकार या व अशा गोष्टी आपण आर्थिक दृष्ट्या किती सुसज्ज आहोत हे ठरविण्यात फार महत्वाच्या असतात. मात्र युद्धाचे अर्थव्यवस्थेवरील दूरगामी परिणाम केव्हाही दुर्लक्षिता येणार नाहीत. कारण जरी आपण जेते ठरलो, तरी आर्थिकदृष्ट्या अगदीच भुईसपाट होऊन चालणार नाही. याचा अर्थ असा नाही की आपल्याला काडीचीही तोशीस न लागता, आहे ते सर्व व्यवस्थित राखून ठेवून युद्ध जिंकता येईल. वरील विधानाचा अर्थ एवढाच की, प्रत्येक टप्प्याटप्प्यावर संरक्षणाची निकड नि समाजाच्या दूरगामी कल्याणाचे उद्दिष्ट लक्षात ठेवून सुयोग्य निर्णय घ्यायचे. याकाळात अर्थव्यवस्थेत उलथापालथी होणे अपरिहार्यच असते, पण आपण योग्य निवड करण्याचा प्रयत्न करावा. खालील वेगवेगळे पर्याय आपल्यापुढे असतात ----

(१) युद्धसामुग्री उत्पादक उद्योगधंद्यातील उत्पादनक्षमेतचा पुरेपूर फायदा उठवायचा, त्यांच्यात वाढ करायची. त्यामुळे अर्थव्यवस्थेत फारशी उलथापालथ होणार नाही. फक्त चालू उद्योगधंद्यात कसून प्रयत्न करून वाढ केली म्हणजे झाले. पण हे केव्हा योग्य होईल की जेव्हा देशात आधीपासूनच फार मोठ्या प्रमाणावर युद्धसामुग्रीचे उत्पादन केले जाते किंवा युद्धाचे स्वरूप फारच मर्यादित स्वरुपाचे असेल तर. आपल्या देशातील सध्याच्या आणीबाणीचा विचार करता हा पर्याय केव्हाही योग्य ठरणार नाही.

(२) सर्व प्रकारची हाताशी असलेली किंवा उपलब्ध होऊ शकणारी साधनसामुग्री नागरी उपयोगातून काढून घेऊन लष्करी कामासाठी वापरणे हा दुसरा पर्याय. हे दोन प्रकारांनी करता येईल. एकतर ठराविक साच्याच्या लष्करी वापरातल्या वस्तू म्हणजे लष्करी ट्रक्स्, बहातुकीची विमाने इत्यादी वस्तूंचे उत्पादन करावयाचे. जेणेकरून युद्ध लांबले तरी आपल्याला तग धरता येईल व युद्धसमाप्तीनंतरच्या शांततामय काळात फारसे सायास न करता नागरी उद्योगधंद्यात रूपांतर करता येईल. किंवा विशिष्ट प्रकारच्या युद्धसामुग्रीचे उत्पादन करावयाचे की ज्यासाठी फार मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतवावे लागते, उच्चप्रकारचे शास्त्रीय ज्ञानाचे पाठबळ लागते. आपल्या देशाजवळ ते तुटपुंजेच आहे. यासाठी लागणारे वेगवेगळे भाग देशात बनवू न शकल्याने ते आयात तरी करावे लागतात. पण याकरता फार दूरगामी स्वरूपाची योजनाबद्ध आखणी जरूर असते.

पण सर्वांत अतिशय महत्त्वाचा व निकडीचा कुठला भाग असेल तर तो म्हणजे चालू आर्थिक रचनेचा युद्धकामासाठी कसा वापर करून घेता येईल हा होय. दोन जागतिक महायुद्धांनी ही गोष्ट कशी सर्वप्रथम महत्त्वाची आहे हे पुरेपूर दाखवून दिले आहे. मात्र बदल घडवून आणण्याची शक्यता आणि त्याकरता करावे लागणारे प्रयत्न प्रत्येक उद्योगधंद्यात वेगळे वेगळे असतात. एका टोकाला कापडनिर्मिती, चर्मोद्योग, वगैरे वगैरे— म्हणजेच मुख्यत्वेकरून ग्राहकोपयोगी वस्तू की ज्या नागरी गरजा पण भागवितात आणि लष्कराच्या दृष्टीनेही आवश्यक असतात. यांच्याबाबतीत युद्धप्रयत्नासाठी उपयोग करून घेताना फारसे सायास पडत नाहीत. प्रश्न असतो तो एकच, उत्पादनाचे योग्य वाटप कसे करावयाचे. तेच जर आपण बोटींचे बांधकाम, मोटारी, अवजड यंत्रसामुग्री किंवा काही रासायनिक उद्योगधंदे घेतले तर यांचाही लष्करी मागणी पुरविण्यासाठी उपयोग करता येईल तर अगदी दुसऱ्या टोकाला काही असेही उद्योगधंदे असतात की युद्धजन्य गरजा भागविण्यासाठी त्यांचा फारसा उपयोग करून घेता येत नाही. या दोन टोकांमध्ये कितीतरी वेगळया वेगळया संधी उपलब्ध असतात. सर्वसाधारणपणे शांततामय काळात जितके रासायनिक आणि टिकाऊ स्वरूपाच्या वस्तूंचे उत्पादन जास्त तितके राष्ट्राचे आर्थिक युद्धसामर्थ्य जास्त, टिकाऊ स्वरूपाच्या या वस्तूंचे चटकन् युद्धोपयोगी वस्तूंत रूपांतर करणे किंवा त्यांच्या साहाय्याने इतर युद्धसाहित्याचे उत्पादन करणे सोयीचे जाते. याचकारणास्तव फार मोठ्या प्रमाणावर खनिज, रासायनिक वगैरे उद्योगधंदे देशात असल्याशिवाय प्रथमदर्जाचे युद्धसामर्थ्य राष्ट्राजवळ असूच शकत नाही. अशा प्रकारचे औद्योगिक जाळे देशात निर्माण होणे संरक्षणाकरता नि त्याचबरोबर राष्ट्रविकासासाठी अत्यावश्यक असते.

राष्ट्रसंरक्षणाची ही नवीन जोखीम वाढल्यामुळे आर्थिकविकासाची गति मंदावेल असे जे मत प्रति-



अनुक्रमणिका







पादिले जाते ते मला मान्य नाही. लोकांचे जीवनमान सुधारण्यावर याचा परिणाम होण्याची शक्यता आहे. राष्ट्रसंरक्षणाचे मानेवर पडलेले अवघड जोखड काही कालपर्यंत तरी निघण्याचे चिन्ह दिसत नाही. यामुळे जर आर्थिक प्रगतीचा वेग मंदावला तर त्याचा अपायकारक परिणाम आपल्या युद्धसामर्थ्यावरसुद्धा शेवटी झाल्याशिवाय राहाणार नाही. आपल्याला निदान असे ध्येय ठवायला पाहिजे की, आज नाही तरी लवकरात लवकर देशसंरक्षणाच्या बाबतीतसुद्धा आपण आपल्या पायावर उभे राहू शकू. कारण नेहमी मित्रराष्ट्रांपुढे मदतीसाठी तोंड वेंगाडणे योग्य नव्हे. जरी मित्रराष्ट्रांनी आपण होऊन मदतीचा हात पुढे केला तरी आंतरराष्ट्रीय संबंधात आपले स्वत्व आणि स्वातंत्र्य कायम टिकविण्याच्या दृष्टीने त्या मदतीचा स्वीकार करणे केव्हाही हितावह नव्हे. म्हणूनच खालील गोष्टी नजरेसमोर ठेवून त्या दृष्टीने वागणे अतिशय जरूरीचे आहे.

( १ ) लोकशाही आणि शांतता टिकवून धरण्याच्या जबाबदारीबरोबरच आपल्याला राष्ट्रसंरक्षण नि राष्ट्रविकासाची सांगड घालता आली पाहिजे. शिवाय राष्ट्रसंरक्षण हेच राष्ट्रविकासाचे साधन म्हणून वापरता आले पाहिजे.

( २ ) हे करीत असतानाच, लवकरात लवकर ध्येयप्राप्ती करून घ्यावयाची असेल तर लहान प्रमाणावर उत्पादन करणाऱ्यांवर जास्त भर देऊन व खाजगी विभागाच्या सहकार्यानेच ते करून घेतले पाहिजे.

( ३ ) पण हा विकास साधत असतानाच देशातील सर्वांना, विशेषतः समाजातील खालच्या थरातील लोकांना निदान किमान जीवनमान उपभोगता यावे याकडे संपूर्ण लक्ष पुरविले पाहिजे. याबाबतीत काही गोष्टी औद्योगिक क्षेत्राबाहेरीलसुद्धा आहेत, त्यामुळे त्यांचा विचार करण्याची येथे आवश्यकता नाही. पण एक गोष्ट मात्र सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे व ती म्हणजे अगदी कमीत कमी कालावधीत लोकांच्या अन्नवस्त्रादी गरजा तरी पूर्णांशाने भागविणे अत्यंत निकडीचे आहे; म्हणजेच आपल्याला खालील गोष्टी करावयाच्या आहेत :

( १ ) उत्पादनोपयोगी वस्तूंच्या प्रगतीवर भर देणे.

( २ ) संरक्षणकार्यासाठी औद्योगिक विकासाचा ओघ वळविताना खाजगी विभागाचे विशेषतः छोट्या उद्योगधंद्यांचे सहकार्य मिळविणे.

( ३ ) सगळया राष्ट्रवासीयांच्या निदान अन्नवस्त्रादि गरजा भागतील अशी परिस्थिती देशात निर्माण करणे.

एकदा वरील ध्येये पक्की ठरविल्यावर त्यांच्या सिद्धीसाठी आपल्यापाशी काय साधनसामुग्री आहे याचा विचार करणे क्रमप्राप्त होते. तसे पाहू गेल्यास बऱ्याच मोठ्या प्रमाणात औद्योगिक सामर्थ्य आपल्यापाशी आहे; व त्याचा पुरेपूर उपयोग करून घेणेही शक्य आहे. औद्योगिक विकासालाही नियोजनबद्ध चालना देण्यात आलेली आहे. नवीन उद्योगधंदे सुरू करावयाचे असले किंवा जुन्या उद्योगधंद्यात वाढ करावयाची असली तरी इंडस्ट्रीज डेव्हलपमेंट व रेग्युलेशन ॲक्टखालील विकास विभागाच्या परवानगीनेच या गोष्टी कराव्या लागतात. आपल्या उत्पादनशक्तीत नियोजनबद्ध वाढ करून आयातीला शक्यतो आळा घालण्याचे निकराचे प्रयत्न विकास विभागाद्वारे चालू असतात. सुदैवाने आपल्या देशातील प्रगत किंवा प्रगतीच्या मार्गावर असलेले उद्योगधंदे परदेशी चढाओढीपासून एकप्रकारे संरक्षित आहेत; व शिवाय या मालाच्या मागणीच्या बाबतीतही समाधानकारक परिस्थिती आहे. एक गोष्ट मात्र खरी की इतर कुठल्याही देशात मिळणार नाही इतका नफा मिळवण्याची चटक या उद्योगधंद्यांतील उद्योगपतींना लागलेली आहे. त्यामुळेच एवढा नफा मिळणार नाही अशी दुसरी कुठलीही गोष्ट करण्यास त्यांना प्रवृत्त करणे महा कठिण कर्म होऊन बसले आहे. तरीही यापैकी बहुसंख्य उद्योगधंदे, कच्च्या मालाच्या पुरवठयासाठी म्हणा नाहीतर यंत्रसामुग्रीसाठी म्हणा सरकारवर अवलंबून आहेत. यापैकी काही उद्योगधंद्यांसाठी आधुनिक यंत्रसाधने नि उत्पादनपद्धतींचा वापर केला जातो शिवाय या क्षेत्रात बऱ्याच मोठया प्रमाणावर तांत्रिक तज्ज्ञ नि कसबी कारागीर यांचीही उपलब्धता आहे. त्यामुळे योग्य त्या प्रमाणात कच्च्या मालाचा नि यंत्रसामुग्रीचा पुरवठा केल्यास बऱ्याच उच्च दर्जाचे उत्पादनकार्य या क्षेत्रात होऊ शकेल. छोटे छोटे कारखानेही मोठया औद्योगिक क्षेत्रांच्या आस-

पास बऱ्याच मोठ्या प्रमाणावर विखुरलेले आहेत. या सर्व गोष्टींचा योग्य तो उपयोग संरक्षणकार्यासाठी करून घेण्याचे धोरण आपण ठेवले पाहिजे. ते साधारणपणे खालीलप्रमाणे आखता येईल :

( १ ) अस्तित्वात असलेल्या उद्योगधंद्यांना मदत करावयाची, जेथे जरूर असेल तेथे या उत्पादन-कार्याचा ओघ संरक्षणकार्यासाठी वळवावयाचा व नागरी गरजा भागविण्याच्या वस्तूंकडून ओघ वळवून संरक्षणासाठी आवश्यक अशा वस्तू निर्माण करणे त्याना चटकन्, विशेष यातायात न करता करणे जमावे, यासाठी हाताशी नेहमी तंत्रज्ञ नि यंत्रसामुग्री बाळगण्यास त्यांना प्रवृत्त करावे.

( २ ) बिनवापरातली किंवा जरूरीपेक्षा आधिक्याने असलेली उत्पादनशक्ति संरक्षणासाठी वापरण्यात यावी.

( ३ ) संरक्षणकार्यासाठीच म्हणून नवीन नवीन उद्योगधंदे सुरू करण्यास किंवा चालू उद्योगधंद्यात वाढ करण्यास परवाने द्यावेत.

( ४ ) छोट्या कारखान्यांचा नि उद्योगधंद्यांचा युद्धकार्यासाठी जास्तीत जास्त उपयोग व्हावा.

एक गोष्ट मात्र लक्षात ठेवली पाहिजे की देश-संरक्षणासाठी करावे लागणारे उत्पादनकार्य हे एकूण उत्पादनकार्याचाच एक अविभाज्य घटक आहे आणि औद्योगिक क्षेत्राने केव्हाही आणि कुठल्याही प्रमाणात संरक्षणासाठी उत्पादन करण्याची तयारी ठेवली पाहिजे. आपल्या देशातील एकूण परिस्थितीचा विचार करता या गोष्टीकरता सक्ती करता येणार नाही. त्याकरता थोडीशी सक्ती, पण बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मनधरणी यांचा योग्य तो मेळ बसवून ते अस्त्र वापरावे लागेल.

सुरुवातीला आपल्या संरक्षणात्मक गरजांची एक यादी करणे आवश्यक ठरते. एक ठराविक किमान पातळी तरी निदान आपण गाठण्याचा प्रयत्न केला पाहिजे म्हणजे, मग एकदम कसलेही संकट येऊन ठेपले तरी पुरेशी तयारी करण्याकरता हवी असणारी स्वस्थता आणि अवकाश मिळू शकेल. काही अंशी आपल्या प्रयत्नांनी आणि काही अंशी परदेशी मदतीचा आश्रय घेऊन आपण हे करण्याचा प्रयत्न करीत आहोत. पण अशाप्रकारच्या परदेशी मदतीची दुसरीही एक तांत्रिक बाजू आपण लक्षात घेतली पाहिजे. बाहेरून शस्त्रा-स्त्रांची मदत मिळविणे वगैरे चांगले असले तरी ती योग्य स्थितीत राखणे तितकेसे सोपे नाही. त्याकरिता तातडबोब प्रयत्न केले पाहिजेत. आणि हे काम नुस-त्याच सुट्या भागांचे साठे करून साधणार नाही. आपल्या देशातच या वस्तूंचे उत्पादन करता येईल काय याचा विचार केला पाहिजे. लांबमुदतीच्या युद्ध-साहित्य उत्पादनाच्या कार्यक्रमाचाच हा एक भाग बनविला पाहिजे. या कार्यक्रमाखाली दोन्ही प्रकारांनी उत्पादन वाढविता येईल. नवीन उत्पादनकार्यासही प्रारंभ करावयाचा व अस्तित्वात असलेली उत्पादन-शक्तिही संरक्षण कार्यासाठी वापरावयाची. जेव्हा खरो-खरीचा युद्धप्रसंग उद्भवतो तेव्हा देशवासीय कुठल्याही प्रकारचा त्याग करण्यास तयार असतात, पण जेव्हा संरक्षणासाठी तयारी चालू असते तेव्हा अर्थव्यवस्थेची कमीतकमी उलथापालथ व्हावी याकडे लक्ष पुरविले पाहिजे, निदान किमान नागरी गरजा पुरविल्या गेल्या पाहिजेत.

संरक्षणकार्यासाठी आपण सुसज्ज होत असतानाच आपल्या औद्योगिक क्षेत्रातील एकूण उत्पादनशक्तीचा आढावा पण घेऊन ठेवणे अतिशय जरूरीचे आहे. कारण केव्हा कशाची व कोठे गरज संभवेल हे सांगता येत नाही. शस्त्रास्त्रांचे नुसतेच साठे करून भागण्या-सारखे नक्कीच नाही. उपलब्ध उत्पादनशक्तीची कल्पना असल्याने गरजा जशाजशा बदलतील तसतसे उत्पादनकार्यात योग्य ते फेरफार कितपत करता येतील याची कल्पना येईल. शिवाय यामुळे औद्योगिक क्षेत्रात भावी विकास कुठल्या दिशेने व्हावयास हवा याचीही कल्पना येईल. विकासविभागाने एकूण देशातील उद्योगधंद्यांची गणती करण्याचे काम पूर्ण केले आहे. परवाने देण्याचे काम पण या विभागाकडे असल्यामुळे प्रत्येक कारखान्यातील सर्व गोष्टींची कच्चामाल, यंत्र-सामुग्री, कामगारांचा पुरवठा, बिन वापरातील उत्पादन-शक्ति या सर्व गोष्टींची माहिती या विभागाला असते. सुरवातीला तरी या माहितीचा फारच उपयोग होईल. शिवाय त्यात वेळोवेळी भर घालून ती माहिती अद्य-यावत ठेवता येइल. यामुळे थोडीशी मदत केली तर संरक्षणकार्याला जास्त हातभार कुठले उद्योगधंदे लावू शकतील याचीही नक्की कल्पना येईल. महत्त्वाच्या

उणीवा किंवा दोष उघड होतील व वेळीच ते सुधारण्यास मदत होईल. आपले अंतिम ध्येय विकासाचे असल्यामुळे माझ्या मते आपल्या संरक्षणखात्यात एक संरक्षण उत्पादनविभागाची स्थापना व्हावयास हवी. त्यायोगे एका हाताला आपले सैन्यदल नि दुसऱ्या हाताला नियोजनमंडळ व औद्योगिक क्षेत्रात यांना दृढपणे जोडणारा एकदुवा निर्माण होईल. बिनवापरातील किंवा आधिक्याने असलेल्या उत्पादनशक्तीच्या बाबतीत या विभागाला अग्रहक्क दिला गेला पाहिजे. नवीन विकासयोजनांच्या बाबतीतही या विभागाच्या मताला सर्वप्रथम मान दिला गेला पाहिजे. विकास विभागाच्या निकट सहकार्याने आणि औद्योगिक प्रगतीचे ध्येय सतत नजरेसमोर ठेवून या विभागाने कार्य करीत राहिले पाहिजे.

या विभागाने जे कारखाने, वेळ पडेल तेव्हा संपूर्णपणे संरक्षणकार्यासाठी उत्पादन करण्याचे कबूल करीत असतील त्यांना सरकारमान्यता द्यावी. या व्यवस्थेत पुढे योग्य ते फेरबदल करण्याची सोय ठेवावी; किंवा जे कारखाने संरक्षणकार्यासाठी उत्पादनशक्ति वाढविण्यास तयार असतील अशांचीही नोंद करून ठेवावी. नवीन परवाने देतेवेळी मात्र भावी उत्पादनातील ठराविक भाग संरक्षणकार्यासाठीच करण्यात येईल या अटीवरच द्यावेत. निदान काही काळपर्यंत तरी नवीन सुरू होऊ पाहाणाऱ्या कारखान्यांच्या संरक्षणशक्तीला हातभार लावण्याच्या पात्रतेलाच परवाने देताना प्राधान्य द्यावे. यात फारसे बिचकण्यासारखे काही नाही. कारण अशाप्रकारच्या अटी नवीन उद्योगधंद्यातील उत्पादनाच्या निर्यातीबाबत सर्रास वापरल्या जात आहेत.

पुरेशी जागरूकता नि पूर्ण कार्यक्षमता याचा योग्य तो मेळ घालता आल्यास औद्योगिक उत्पादनाचा संरक्षणकार्यालाही उपयोग करून घेताना फारशी यातायात पडणार नाही. युद्धकार्यासाठी औद्योगिक क्षेत्राचा उपयोग करून घेताना सरकारी कारभारयंत्रणेची गाडीही त्याच दिशेने जुंपावयास हवी. उत्पादन झाल्याबरोबर त्या वस्तूंची नेहमी ताबडतोब तपासणी झाली पाहिजे, व्यवस्थितपणे त्या वस्तू जिथल्या तिथे पोहोचत्या केल्या पाहिजेत, पैशाची व्यवस्था झाली पाहिजे, कामाच्या बाबतीत कुठल्याहीप्रकारे अळंटळं न करता किंवा कटकटी निर्माण न होता वेळच्यावेळी सर्व करून घेण्याचे कसब सरकारी यंत्रणेच्या ठायी यायला हवे. आपल्या देशाचा विस्तार लक्षात घेता, एका ठिकाणी बसून हे सर्व पार पाडणे शक्य दिसत नाही. हे सर्व जर विनासायास नि सुयोग्यपणे घडून यावयास हवे असेल तर निरनिराळ्या औद्योगिक क्षेत्राच्या ठिकाणी आवश्यक त्याप्रकारची व्यवस्था करावी लागेल व त्यामुळे औद्योगिक विभागाचे सहकार्य पण मिळेल.

संरक्षण उत्पादनविभागाकडून ज्याची नोंदणी झालेली आहे त्या कारखान्यांना मात्र ठराविक फायदे मिळालेच पाहिजेत. कच्च्या मालाचा पुरवठा, वाहातूक साधने, वगैरेंच्या बाबतीत त्याना अग्रहक्क द्यावेत. कर्जे देताना त्याना प्राधान्य द्यावे, विशिष्ट सवलती द्याव्यात. विशेष प्रकारची साधनसामुग्री त्याना आयात करूनही पुरवावी. त्याना काही ठराविक मर्यादेपर्यंत जादावेळ काम करण्यासही परवानगी द्यावी. सुट्या भागाच्या उत्पादनाच्या बाबतीत छोट्या छोट्या कारखान्यांचा उपयोग करून विकेन्द्रीकरणाच्या तत्वावर युद्धकार्यासाठी याचा योग्य वापर करून घेता येईल.

वरील सर्व प्रयत्नांना गती यावयास हवी असेल तर मशीनटूल इंडस्ट्रीला प्राधान्य द्यावयास हवे. आतापर्यंत आपण या क्षेत्रात केलेल्या विकासाच्या कितीतरी अधिकपट प्रयत्न व्हावयास हवेत, जोरदार चालना मिळावयास हवी, मोठ्या प्रमाणावर शस्त्रास्त्रनिर्मिती करावयाची असली तरीही हे अत्यावश्यक आहे. या उद्योगधंद्याच्या विस्तारावर नि देशापाशी असलेल्या द्रव्याच्या साठ्यावर, दुसऱ्या उद्योगधंद्यांना संरक्षणउत्पादनासाठी किती लवकर जुंपता येईल हे बहुतांशी अवलंबून असते. दुसऱ्या महायुद्धात जर्मनीला सुरवातीला मिळालेल्या यशाचे सार अतिशय मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात असलेल्या या उद्योगधंद्यातच आहे.

पण केवळ या उद्योगधंद्याच्या विस्तारावरच सर्व अवलंबून नसते हे नंतरच्या घडामोडींनी सुस्पष्ट केले. जर्मनीला युद्धात जी हार खावी लागली त्यापैकी एक कारण ज्या ठराविक प्रकारची मशीन टूल्स निर्माण करीत, त्यालाच आहे. कारण त्याप्रकारच्या टूल्ससाठी मनुष्यबळही जास्त लागे, व उत्पादनक्षमताही कमी



अनुक्रमणिका

असे. जेव्हा आपण औद्योगिक प्रगतीची आखणी करीत असतो तेव्हा आपण इतरांना आलेल्या अनुभवाचा अभ्यास करून व आपल्या परिस्थितीचा योग्य तो विचार करून त्यावरून काय तो धडा घेणेच योग्य ठरेल असे मला वाटते.

आपण जास्त लक्ष पुरविले पाहिजे असे दुसरे एक क्षेत्र म्हणजे रासायनिक उद्योगधंदे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेखालील या क्षेत्रातील उद्दिष्टे पूर्णत्वास न्यायची असतील तर त्यासाठी अधिक मेहनत घ्यावयास हवी.

भांडवलाचा पुरवठा हा एक अडचणीत टाकणारा कूटप्रश्न आहे. याकरता उत्पादनक्षमतेला बाधा न येता भांडवलात शक्यतो बचत करता येतील अशा उत्पादनपद्धतींचा अवलंब आपल्याला किनपत करता येईल याचा विचार केला पाहिजे. बांधकामासारख्या क्षेत्रात मनुष्यबळाचा जास्त वापर करता येतो, शिवाय आपल्याकडे जे बिनकसबी मनुष्यबळ फार मोठया प्रमाणावर आहे त्यांना या क्षेत्रात सामावून घेता येईल. औद्योगिक क्षेत्रातील अवघड नि बिकट गोष्टींकडे जसजसे आपण वळू तसतशा मात्र या गोष्टीला मर्यादा पडत जातात. यचबरोबर उपलब्ध भांडवलाचा योग्य रीतीने वापर करून घेता आला पाहिजे, आणि म्हणूनच औद्योगिक क्षेत्राचे काही काही गोष्टीत नियमन करणे अपरिहार्य होऊन बसते.

भांडवलाप्रमाणे वेगवेगळया शाखातील कसबाचाही योग्य उपयोग करून घेता आला पाहिजे. कारण त्याचाही तुटवडा जाणवतोच. खरोखरीचा युद्धप्रसंग उद्भवलेला नसला तरी जे उद्योगधंदे पुढे युद्धकार्यासाठी वापरता येण्याजोगे असतील त्यांच्यापाशी असलेल्या तंत्रज्ञाना पुढे जरी गरज पडली तर संरक्षण उत्पादनासाठी चटकन तयार राहता यावे यासाठी योग्य ते शिक्षण देण्यास प्रवृत्त करावे. औद्योगिक विकासाचे विशेषतः संरक्षणासाठी कराव्या लागणाऱ्या उत्पादनाचे ध्येय नजरेसमोर ठेवून त्या दृष्टीनेच शिक्षण देण्याचे कार्यक्रम सुरू करावेत.

आपल्या देशात आपण आधीच नियोजनबद्ध औद्योगिक विकासाच्या वाटचालीला प्रारंभ केलेला असल्यामुळे नागरी उद्योगधंद्यांचे रूपांतर संरक्षणकार्यासाठी करून घेणे थोडेसे सोपे जाईल व या गोष्टीचा आपण पुरेपूर फायदा उठविला पाहिजे. दुसऱ्या आणि तिसऱ्या पंचवार्षिक योजनाकालातील आपली प्रगतीही या दृष्टीने समाधानकारक आहे. सरकारी विभागातर्फे मुख्य मुख्य, अतिशय महत्त्वाच्या उत्पादनोपयोगी उद्योगधंद्यांना जी चालना देण्यात आलेली आहे ती एकूण औद्योगिक विकासाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण आहे. सरकारी कारभारयंत्रणा पुरेशी जागरूक नि कार्यक्षम असेल तर या गोष्टींचा योग्य कारणासाठी नि काळजीपूर्वक उपयोग करून पुरेपूर फायदा उठविता येईल, नि त्यायोगे देशाची संरक्षणक्षमता पण वृद्धिंगत करता येईल. हेच आपल्याला एकप्रकारचे आव्हान आहे आणि ते स्वीकारले पाहिजेच पाहिजे. त्याकरिता आपण आपल्यालाच शिस्त लावून घेतली पाहिजे. एकप्रकारे औद्योगिक क्षेत्रातील विकासाची तयारी ही एकूण राष्ट्रीय सुसज्जतेचाच एक भाग म्हणून करणे म्हणजेच वर दिलेल्या राष्ट्रीय शिस्तीचेच एकनिदर्शक होय. आणि ही अशीच वृत्ती आपल्याला आतापासून अंगी बाणून घ्यावयास हवी.

---



















अनुक्रमणिका

श्री. प्र. रा. देशमुख

# आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना (उत्तरार्ध)

आर्यांच्या भारतात प्रवेशाची मॅक्समुल्लरने ठरविलेली कालगणना बरोबर नाही हे आपण पाहिले. सिंधुउत्खननात उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून, ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचांच्या पुराव्यावरून व सुमेरमध्ये उपलब्ध झालेल्या सिंधुघाटाच्या मुद्रांच्या पुराव्यावरून आर्यांच्या भारतातील प्रवेशाचा काल बरोबर निश्चित करणे शक्य आहे. तसा प्रयत्न आतापावेतो झाला नाही. सर जॉन मार्शल व सर मार्टीमर व्हिलर या सिंधुउत्खननात भाग घेणाऱ्या दोन विद्वानांनी सिंधुसंस्कृतीची कालगणना ठरविण्याचा प्रयत्न केला. ती ठरवीत असताना त्यांनी मॅक्समुल्लरने ठरविलेली आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना बरोबर आहे असे गृहीत धरून त्याच्या आधारावर सिंधुसंस्कृतीची कालगणना ठरविण्याचा प्रयत्न केला. ती अर्थातच चुकीची झाली आहे. सिंधुउत्खननातील पुराव्याच्या व ऋचातील पुराव्याच्या साहाय्याने भारतीय विद्वानांनी आर्यांच्या भारतात प्रवेशाचा अथवा सिंधुसंस्कृतीचा काल ठरविण्याचा स्वतंत्र प्रयत्न केला असल्याचे प्रस्तुत लेखकास माहीत नाही.

## सिंधुसंस्कृतीतील पुरावा

सिंधुसंस्कृतीत वापराच्या मुद्रा फार मोठ्या प्रमाणावर म्हणजे अंदाजे ५३७ सापडल्या आहेत. या मुद्रांवर आर्यपूर्वांची चित्रलिपी, त्यांच्या देवांच्या मूर्ती व त्यांना पूज्य असलेल्या वस्तूंच्या आणि इतर महत्त्वाच्या वस्तूंच्या प्रतिमा आहेत. ह्या मुद्रा व्यापारी मुद्रा असाव्या असा समज आहे. सिंधुसंस्कृतीतील आर्यपूर्व प्राय: व्यापारी होते. ऋचातूनही त्यांचे वर्णन पणी म्हणजे व्यापारी असेच केले आहे. सुमेरमध्ये सिंधुघाटाच्या सात आठ मुद्रा उपलब्ध झाल्या आहेत. सिंधुव्यापाऱ्यांचा व्यापार दूरवर सुमेर पावतो चालत होता. तसेच चित्रलिपीची ओळख सुमेरमधील लोकांनाही असावी. सुमेरिअन लोक सिंधुसंस्कृतीतील लोकांप्रमाणे डोक्यावर शिंगे धारण करीत असत हेही प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविले आहे. भारतीय सिंधुसंस्कृतीतील आर्यपूर्वांची चित्रलिपी व्यापाराच्या निमित्ताने प्रथम सुमेरमध्ये गेली असावी; व त्याच निमित्ताने सिंधुमुद्रांनीही सुमेरमध्ये प्रवेश केला असावा.

## सुमेरमध्ये सापडलेल्या भारतीय मुद्रा

सिंधुसंस्कृतीतील आर्यपूर्वांचा सुमेरिअन लोकांशी व्यापारसंबंध सारगोन ऑफ अक्काडच्या काळात म्हणजे इ. स. पूर्व २३५० च्या सुमारास फार घनिष्ट होता. याच काळातील सात अथवा आठ सिंधुघाटाच्या मुद्रा सुमेरमध्ये उपलब्ध झाल्या आहेत. त्या अशा उर (१ अथवा २) किश (२) टेलअस्मार (२) टेपेगाव्रा (१) व सुसा (१). या सात मुद्रांपैकी कमीतकमी चार मुद्रांचे तरी मोहेंजदारो येथे उत्खनित झालेल्या मुद्रांशी साम्य आहे. हरप्पा उत्खननात उत्खनित झालेल्या मुद्रांशी साम्य नाही. उरलेल्या तीन मुद्रांपैकी एक टेलअस्मार येथे सापडलेली सिलेंडरच्या आकाराची आहे. ही सिंधुघाटाची आहे हे निस्संशय आहे. मोहेंजदारो येथे ५′-९″, ११′-८″, १४′-२″ या निरनिराळ्या खोलीवर तीन सिलेंडरच्या आकाराच्या मुद्रा सापडल्या आहेत. टेलअस्मार व टेपेगाव्रा येथे सापडलेल्या चौकोनी मुद्रांची तुलना मोहेंजदारोच्या मुद्रांशी होते. मुद्रातील फरक व त्या








निरनिराळया खोलीवर आढळणे यावरून अक्कादिअन काळ जो इ. स. पूर्व २३५० निश्चित काळ ( fixed point ) मानला आहे तो सिंधुसंस्कृतीचा अंतर्गत विचारकरता निश्चितकाळ मानता येत नाही. त्याचे शेवटचे टोक इ. स. पूर्व २३५० असले तरी ही संस्कृती बरीच मागे जाते. सुमेरमध्ये सापडलेल्या मुद्रांवरून जर काही शाबित होत असले तर ते इतकेच की इ. स. पूर्व २३५० पूर्वी भारतीय लोकांचा सुमेरिअन लोकांशी घनिष्ट व्यापार संबंध होता.

## अक्कादिअनपूर्व काळातील दोन सुमेरमधील मुद्रा

उरमध्ये सापडलेल्या दोन मुद्रा सर्वात जुन्या असून त्या अक्कादिअनपूर्व म्हणजे इ. स. पूर्व २३५० च्या पूर्वीच्या आहेत. ह्या मुद्रा जुन्या आणि इतर मुद्रांपेक्षा जरा ओबडधोबड आहेत. या मुद्रांशी साम्य दर्शविणारी मुद्रा मोहेंजदारोमध्ये १४'-८'' खोलीवर सापडली आहे. या मुद्रांवरून एक गोष्ट निश्चित सिद्ध होते ती ही की सिंधुसंस्कृतीचा काल इ. स. पूर्व २३५० च्या पूर्वीचा होता. इतर पुराव्याच्या साह्याने सर जॉनमार्शलने प्रथमतः सिंधुसंस्कृतीचा काळ इ. स. पूर्व २७५० ठरविला होता तोच बरोबर होता हे मुद्रांच्या पुराव्यावरून निश्चित सिद्ध होते.

सिंधुसंस्कृतीत मुद्रा निर्माण झाल्याबरोबर सुमेरमध्ये गेल्या व त्या गडप झाल्या असे मानले तर सिंधुसंस्कृतीचा काळ इ. स. पूर्व २३५० मानता येईल. परंतु काही मुद्रांचा काळ त्या पूर्वीचा आहे. सिंधुसंस्कृतीतून मुद्रा सुमेरमध्ये जाण्यापूर्वी सिंधुसंस्कृती वाढण्यास, तिचा व्यापार वाढण्यास व सुमेरपर्यंत जाण्यास, चित्रलिपी निर्माण होण्यास, तिचा प्रसार होण्यास व ती एका देशातून दुसऱ्या देशात जाण्यास तसेच सिंधुसंस्कृतीचा एवढ्या मोठ्या प्रमाणावर विस्तार होण्यास व व्यापाराची वाढ होण्यास अनेक शतकांच्या कालावधीची जरूरी आहे. इ. स. पूर्व २३५०च्या पूर्वी अनेक शतके सिंधुसंस्कृती अस्तित्वात असावी हे मानणे क्रमप्राप्त आहे.

सुमेरमध्ये जशा सिंधुघाटाच्या मुद्रा उपलब्ध झाल्या तसेच खोदकाम केलेली हाडे, मणी, पिना, गळयात घालण्याचे पदक असलेले दागिने, सुऱ्या इत्यादि हरप्पातील वस्तूंशी सदृश अशा वस्तू उपलब्ध झाल्या. त्यावरूनही सिंधुसंस्कृती इ. स. पूर्व २३५० पूर्वी अनेक शतके अस्तित्वात असली पाहिजे हेच सिद्ध होते.

## सिंधु संस्कृतीच्या उत्खननापासून महत्वाचा लाभ

सिंधुउत्खननात उपलब्ध झालेल्या विविध वस्तूवरून सिंधुसंस्कृतीचा कालनिर्णय करण्यास मदत होत असली तरी ऋचातून दिसणाऱ्या इतिहासाशी सिंधुउत्खननातील पुरावा जोडल्याशिवाय सिंधु संस्कृति भारतीय इतिहासाचा अविभाज्य भाग होऊ शकत नाही. तसेच सिंधु संस्कृतीच्या कालगणनेवरून आर्यांचा भारतात प्रवेश व ऋचांची निर्मिती यासारख्या भारतीय इतिहासातील महत्वाच्या घटनांची कालगणना ठरविता येणार नाही. त्यासाठी सिंधु संस्कृतीतील दृश्य वस्तूंची ऋचातील आर्यांच्या शत्रूंशी व त्यांच्या संस्कृतीशी तुलना करून ते दोन्ही एकच आहेत हे निश्चितपणे दाखविल्याशिवाय सिंधुसंस्कृती भारतीय इतिहासास जोडता येणार नाही. सिंधुसंस्कृति आणि ऋचातील आर्यांच्या शत्रूंची संस्कृति एकच असून आर्यांनी तिचा विनाश केला हे निश्चितपणे दाखविले पाहिजे. तसा प्रयत्न येथे केला आहे.

## ऋचातील पुरे व सिंधुउत्खननातील शहरे

ऋचातून आलेली तटबंदीच्या शहराची वर्णने सिंधुउत्खननात उपलब्ध झालेल्या शहरांशी तंतोतंत जुळतात. इतकेच नव्हे तर अग्नीच्या साह्याने त्यांचा








नाश झाला हे ऋचातील वर्णन सिंधुउत्खननातील शहरात प्रत्यक्ष पहावयास मिळते.

## पुरांचे ऋचातून येणारे विशेष वर्णन

पुराच्या तटबंदी, सभोवताली असणारे जलांचे खंदक, नद्यांच्या काठावरील त्यांची रचना, इतकेच नव्हे तर वाकडे आणि वळणाची दारे असणे हे वैशिष्ट्य ज्याचा ऋचातून 'जिह्मद्वारं' व 'वृकद्वरसाः' (वाकडी दारे असलेले) असे वर्णन आहे ती शहरे प्रत्यक्ष पहावयास मिळतात. साधारण साम्यच नव्हे तर इतरत्र न आढळणारे व ज्यामुळे दोहोंचे एकत्व संशयापलीकडे सिद्ध होते असे वैशिष्ट्यही दिसते. इतकेच नव्हे तर 'हरियुपिया' शहरात कोणाचे राज्य होते ते अभ्यावर्ति चायमानाने कसे काबीज केले याच्या वर्णनाचेही सूक्त आहे. 'हरियुपिया' म्हणजे सिंधुउत्खननातील हरप्पा असण्याची फार शक्यता आहे असे प्रस्तुत लेखकाने अन्यत्र[१] दाखविले आहे. दुसरे ऋचातील महत्वाचे शहर 'दुर्योण' हे होय. दुर्योण याचा अर्थ दरवाज्याचे शहर असा आहे. दुर्योण शहराबद्दल ऋचातून अत्यंत महत्वाची माहिती मिळते ती अशी! दुर्योण हे शिंगे धारण करणाऱ्या शुष्णाचे राजधानीचे शहर, शुष्णाला 'मृध्रवाचः' अथवा 'कुयवाचः' असे ऋचातून उल्लेखिले आहे. शहराला तटबंदी असून सर्व बाजूने पाण्याचा वेढा होता. ते सर्व बाजूंनी सुरक्षित असून आतील लोकांना बाहेरील शत्रूवर मारा करता येत होता. शहरात धन पुष्कळ होते व धान्याचेही मोठे कोठार होते. दुर्योण मधील धन व धान्य लुटण्यासाठी कुत्साने स्वारी केली होती. या स्वारीला 'अर्कसाता' म्हणजे धान्य लुटण्यासाठी स्वारी असे ऋचातून संबोधिले आहे. या युद्धात 'दुर्योण' शहर जाळण्यात आले व आतील लोकांची कत्तल करण्यात आली. 'दुर्योण ही दासांची मृत्युशय्या केली' असे ऋचातून वर्णन आहे. दुर्योण हे काबीज केलेले तिसऱ्या नंबरचे शहर होय. दुर्योण शहराचे ऋचातून मिळणारे वरील वर्णन उत्खननात उपलब्ध झालेल्या मोहेंजदारोच्या वर्णनाशी तंतोतंत जुळते. शहरास तटबंदी, सभोवती खंदक, शहर संपत्तीने समृद्ध, शहरात धान्याचे मोठे कोठार, शहर काबीज करण्यात अग्नीचा उपयोग, मोहेंजदारो नावाशी सदृश दासांची मृत्युशय्या असे ऋचातून संबोधणे इत्यादि सर्व वर्णन उत्खननातील मोहेंजदारोला अक्षरशः लागू पडते. असे असले तरी दुर्योण व मोहेंजदारो हे एकच आहेत असे दाखविणारा प्रत्यक्ष पुरावा अद्यापि उपलब्ध झाला नाही. ऋग्वेदातील अंशुमती शहर अद्यापि उत्खनित व्हावयाचे आहे. ऋचांची सिंधु उत्खननातील पुराव्याशी तुलना करून ऋग्वेदातील पुरे व सिंधु उत्खननातील शहरे एकच आहेत हे प्रस्तुत लेखकाने इतरत्र[२] सविस्तर दाखविले आहे. येथे त्याचा त्रोटक उल्लेख केला आहे. रंग, रूप, मनोरचना, सांपत्तिक-स्थिती, व्यापार धंदे, संघर्ष इत्यादि सामान्य गोष्टींची तुलना करून ऋचातील आर्यांचे शत्रु व सिंधुसंस्कृतीतील लोक एक ठरतात इतकेच नव्हे तर काही अगदी विशिष्ट गोष्टीवरूनही त्यांचे एकात्म्य संशयापलीकडे सिद्ध झाले आहे. त्यांचा 'वृषशिप्र' म्हणजे शिंगे धारण करणारे असा ऋचातील उल्लेख व शिंगे धारण करणाऱ्या देवांच्या आणि मनुष्यांच्या मुद्रावरील प्रतिमा, ते लिंगपूजक असल्याबद्दल त्यांचा 'शिश्नदेवाः' म्हणून ऋचातून केलेला उपहासात्मक उल्लेख व सिंधुउत्खननात उपलब्ध झालेले लिंगाच्या आकाराचे देव, 'मृध्रवाचः' म्हणजे

(१) 'नवभारत' १९५६ सप्टेंबर "सिंधुउत्खननातील शहरे व ऋग्वेदातील पुरे"

(२) The Indus Civilisation in the Ṛgveda या पुस्तकात आणि नोट १ मध्ये दर्शविल्याप्रमाणे.








जिभेला चिरा देण्याची पद्धती इत्यादि गोष्टीवरून सिंधुसंस्कृतीतील लोक व आर्यांचे ऋचातून वर्णन असलेले शत्रू हे एकच होते याबद्दल बिलकुल संशय उरत नाही. या सर्वापेक्षा निर्णायक तीन तोंडाच्या देवाचा पुरावा होय. सिंधुमुद्रांवर या तीन तोंडाच्या देवाची प्रतिमा आहे व ऋचातून त्याचे वर्णन व ' विश्वरूप ' असे नाव आहे. त्याचा विध्वंस आर्यांनी केल्याचा उल्लेख आहे.

सिंधुसंस्कृति आणि आर्यांच्या शत्रूंची ऋचातून वर्णन असलेली संस्कृति एकच असून सिंधुसंस्कृतीतील लोकच ऋचातून वर्णन असलेले आर्यांचे शत्रू होत हे प्रस्तुत लेखकाने ' The Indus Civilisation in the Ṛgveda ' या पुस्तकातून दाखविले आहे. प्रस्तुत हिंदुसंस्कृति संमिश्र संस्कृति असून तिचा उगम प्राचीन सिंधुसंस्कृतीत असल्याचे दाखविण्यासाठी नवभारतातून ' सिंधु संस्कृतीतील लोकच ऋग्वेदातील आर्यांचे शत्रू ' ही लेखमाला व याच मासिकातून त्या पूर्वी पाच लेख प्रसिद्ध केले आहेत. प्रस्तुत लेखकाने उत्खननातील पुराव्याची ऋचातील पुराव्याशी तुलना करून आर्यांचे ऋचात वर्णन असलेले शत्रू व सिंधु संस्कृतीतील लोक एकच आहेत हे सिद्ध केले आहे.

**विद्वानांची प्रतिक्रिया** ( Reaction )

आर्यांचे ऋचात वर्णन असलेले शत्रू आणि सिंधु संस्कृतीतील लोकांच्या एकात्मतेबद्दल विद्वानांची काय प्रतिक्रिया आहे ती विषद करणे जरूर असल्यामुळे आत्मश्लाघेचा दोष पत्करूनही प्रस्तुत विषयासंबंधी विद्वानांच्या मतांचा उल्लेख करणे जरूर आहे. तसे न केल्यास ऋचातील आर्यांचे शत्रू व सिंधु संस्कृतीतील लोक यांच्या एकात्मतेबद्दल विद्वानांचे काय मत आहे ते वाचकांना कळणार नाही. प्रस्तुत लेखकाने सिंधुउत्खननातील पुराव्याची ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचातून उपलब्ध होणाऱ्या आर्यांच्या शत्रूसंबंधी पुराव्याशी तुलना करून सिंधुसंस्कृतीतील लोकच आर्यांचे शत्रू होत हे दाखविण्यासाठी Indus civilisation in the Ṛgveda हे पुस्तक प्रसिद्ध करून त्यावरील इन्डालजीतील तज्ज्ञांची मते जाणून घेण्यासाठी पुस्तकांच्या प्रती त्यांच्याकडे पाठविल्या होत्या. त्यावर आलेल्या मतांपैकी काही मते खाली उद्धृत केली आहेत.

रेव्हरन्ड फादर एच् हेरास ( एस्. जे. )

" I must say that I consider your publication a very valuable contribution to the Proto-historic period of Indian History. The reflexion of the Proto-Dravidian civilisation in the Ṛgvedic hymns is a fact which can not be doubted any more, but it is pleasing to find it affirmed by you so boldly and so authoritatively. I am glad to inform yon that you will find your views referred to and quoted in my second volume of the studies in Proto-Indo Mediterranean culture, which I am now preparing for the press. "

प्रा. के. ए. नीलकंठ शास्त्री, इन्डालजीचे प्राध्यापक महाराजा कालेज मैसुर–

" I have read the book with care and I am glad to say that I find my self in agreement with much that you have pointed out which has not been clearly put before by any other writer. "

डॉ. एन् पी. चक्रवर्ती M. A. P H D (cantub) सेवानिवृत्त डायरेक्टर जनरल ऑफ आर्किआलजी इन इंडिया अध्यक्ष इतिहास काँग्रेस १९५४.

1 have read the book with great interest and agree with most of your views the Indus people visavis the Aryans. "



अनुक्रमणिका






याशिवाय डॉ. एम्. एस्. अणे, डॉ. जार्ज एम्. मोन्यास, डॉ. सुनीतिकुमार चाटर्जी, डॉ. हिरालाल जैन, डॉ. के. एल्. दप्तरी, डॉ. व्ही. डब्ल्यू. करंबेळकर प्रा. यु. के. घोषल, प्रा. बी. के. मुजूमदार इत्यादींचे अनुकूल अभिप्राय आले आहेत. स्थलाभावास्तव ते येथे देता येत नाहीत.

भारतातील महत्वाच्या वृत्तपत्रांनी व नियतकालिकांनी समालोचन केले आहे. त्यातील दिल्लीहून प्रसिद्ध होणाऱ्या हिंदुस्थान टाइम्समधील समालोचनाचा महत्वाचा भाग असा :

" It is the contention of mr. Deshmukh that the Dasyus with whom the Aryans Fought were identical with the peoples who developed the 'Indus valley civilisation' and it was in consequence of the wars waged by the Aryans that the civilisation perished. He has canvincingly proved the truth of his thesis and he has succeeded in establishing a link between the prehistoric and historic past of the country."

ही मते उद्धृत करण्याचा एकच हेतू आणि तो म्हणजे प्रस्तुत लेखकाच्या सिंधुसंस्कृतीतील लोक हेच ऋचातून वर्णन असलेले आर्यांचे शत्रू होत व आर्यांच्या संघर्षाने त्यांच्या संस्कृतीचा विनाश झाला ह्या मताशी भारतातील विद्वान सहमत आहेत हे दर्शविणे हा होय. त्या योगाने सिंधु संस्कृति भारताच्या वाङ्मयीन इतिहासाशी जोडली जाते. ती तशी जोडली गेल्याशिवाय भारतीय इतिहासाचा अविभाज्य भाग होऊ शकत नाही असे सर मार्टिमर व्हिलरचे मत होते. प्रस्तुत लेखकाने सिंधु संस्कृति हीच वेदात वर्णन असलेल्या आर्यांची संस्कृति होय व आर्यांच्या संघर्षामुळे तिचा विनाश झाला हे दाखवून दिले आहे. त्यामुळे ऋग्वेद सिंधुसंस्कृतीशी जोडला जातो. भारतीय इतिहास एका महान संस्कृतीशी जोडला जाऊन अनेक शतके मागे जातो.

## कालगणनेस परस्परांचा उपयोग

सिंधु संस्कृति आणि ऋग्वेद मिळून भारताचा सलग इतिहास झाल्यावर परस्परांच्या कालगणनेस एकमेकाचा उपयोग होतो. सिंधुउत्खननाच्या पुराव्यावरून प्रथम सिंधु संस्कृतीचा काळ इ. स. पूर्व २७५० ठरविला होता. तो मॅक्समुल्लरने ठरविलेल्या ऋग्वेदाच्या काळाशी ( इ. स. पूर्व १५०० ) जुळविण्यासाठी चारशे वर्षे अलीकडे ओढण्यात आला. त्यापेक्षा अलीकडे ओढणे शक्य नव्हते कारण सुमेरमधील मुद्रांचा काल अक्कादिअन काल ( इ. स. पूर्व २३५० ) समजला जातो. सिंधु संस्कृतीतील मुद्रा निर्माण होण्यास व त्या सुमेरपर्यंत जाण्यास, त्यावरील चित्रलिपी निर्माण होण्यास व तिचा सुमेरपर्यंत प्रचार होण्यास, तसेच सिंधु संस्कृतीत व्यापाराची वाढ होऊन व्यापार सुमेरपर्यंत पसरण्यास इ. स. पूर्व २३५० च्या पूर्वी अनेक शतकाच्या कालावधीची जरूरी आहे.

दोनमुद्रा अक्कादिअनपूर्व काळातल्या म्हणजे इ. स. पूर्व २३५० च्या पूर्वीच्या आहेत हे आपण सुरवातीस पाहिले. या दोन्ही कारणामुळे सिंधु संस्कृतीचा काल इ. स. पूर्व २३५० च्या अनेक शतके पूर्वीचा होता हे निश्चित दिसते. सिंधुउत्खननातील पुराव्याच्या साहायाने सुरवातीस ठरविलेला इ. स. पूर्व २७५० हा काळ बरोबर होता असे मानले पाहिजे. हा काळ सिंधुउत्खननात सापडलेल्या वस्तूंचा आहे असे मानल्यास आर्यांबरोबर सिंधुसंस्कृतीतील लोकांचे संघर्ष त्या पूर्वी झाले असावे. कारण संघर्षाचे शेवटी ह्या वस्तू जमिनीत गडप झाल्या.

## संघर्षाचा काळ

आर्यांचे सिंधुसंस्कृतीतील शत्रूंशी संघर्ष अनेक शतके चालले होते. आर्यांच्या टोळ्या भारतात आल्या आणि त्यांनी तेथील लोकांशी संघर्ष करून त्यांची संस्कृती तावडतोब नष्ट केली अशी कल्पना केल्यास ती चुकीची होईल. आर्य भारतात येऊन अनेक शतकेपर्यंत मोठी सैन्ये जमविली व राज्ये मिळविली व नंतर एकत्र



अनुक्रमणिका

होऊन आर्यपूर्वांशी संघर्ष केले व त्यांची तटबंदीची शहरे नष्ट केली. दरम्यानच्या काळात आर्य आर्यपूर्वीचे धान्याचे काफले व कोठारे लुटणे, पशुधन वळवून नेणे, शेतातील पीक लुटणे, शेतावर जबरदस्तीने कबजा करणे, संपत्ती, सोने, मौल्यवान दगड आणि सर्वप्रकारच्या उपभोग्य वस्तू लुटून नेणे इत्यादि लूटमारीची कामे करीत व सैन्य वाढवीत. या काळात आर्य राज्य मिळविण्यासाठी आपसातही युद्ध करीत होते. ऋचातून जे संघर्ष वर्णिले आहेत तो आठ नऊ पिढ्यांचा इतिहास आहे. ऋचात भारताची सुरुवात वध्र्यश्वापासून आहे. वध्र्यश्वाचा मुलगा प्रसिद्ध दिवोदास, दिवोदासाचा मुलगा पिजावन, पिजावनाचा मुलगा दाशराज्ञ युद्ध जिंकणारा प्रसिद्ध सुदास (सुदास दिवोदासाचा मुलगा होता अथवा नातू होता या बद्दल संशय आहे.) असा भारताचा इतिहास तीन अथवा चार पिढयांचा आहे. त्याची वर्णने तीच ती सर्व मंडळातून आली आहेत. सुदास व पुरुवंशातील श्रेष्ठ राजा पुरुकुत्स समकालीन होते. पुरुकुत्साने दासाकडून सात शारदीय पुरे जिंकून घेतली होती. पुरुकुत्स दाशराज्ञ युद्धात मारला गेला. पुरुकुत्साचा मुलगा प्रसिद्ध त्रसदस्यू, त्रसदस्यूचा मुलगा कुरुश्रवण. त्रसदस्यूच्या नातवापर्यंतची माहिती ऋचातून मिळते. पुरूंच्या पाच पिढया व पूर्वीच्या भारताच्या चार पिढया असा आठ अथवा नव पिढयांचा इतिहास ऋग्वेदात कालानुक्रमाने सापडतो. म्हणजे सुमारे दोन शतकांचा त्रोटक इतिहास ऋचातून आढळतो. ह्या दोन शतकात आर्य राजे अथवा ज्यांच्याजवळ सैन्य आहे असे लोक होते. प्रसिद्ध दिवोदास, पुरुकुत्स आणि औयु यानी एकत्र होऊन सहस्रावधी दासांची कत्तल केली. त्यांना राज्य संपादन करण्यास एक शतकाचा अवधी व नंतरचा एक शतकाचा काळ मिळून आर्यांची भारतात सत्ता प्रस्थापित होण्यापूर्वी म्हणजे सिंधुसंस्कृतीतील शहरे नष्ट होण्यापूर्वी सुमारे चारशे वर्षापूर्वी आर्यांनी भारतात प्रवेश केला असावा असे ऋचावरून निश्चित अनुमान काढता येते. सिंधुसंस्कृतीचा सर जॉन मार्शलने प्रथम ठरविल्याप्रमाणे इ. स. पूर्व २७५० हा काळ सिंधु संस्कृतीच्या विनाशाचा काळ धरल्यास चारशे वर्षापूर्वी संघर्षास सुरुवात मानली पाहिजे. ही सुरुवात इ. स. पूर्वी ३१०० वर्षापूर्वी झाली असली पाहिजे आणि हीच कलियुगाची सुरवात असावी.

### कलियुग

भारतीय हिंदूंच्या कोणत्याही धार्मिक कृत्यास सुरवात करताना संकल्प करावा लागतो. गंगास्नानादि कृत्येही संकल्पाशिवाय सफल होत नाहीत. संकल्पात कालगणना कलियुगापासून सुरू होते. ज्योतिष गणिताप्रमाणे कलियुगाची सुरवात इ. स. पूर्व ३१०२ या वर्षी होते. ही सुरवात संघर्षाच्या सुरवातीपासून धरली आहे अथवा शेवटापासून धरली आहे हा अद्यापि वादग्रस्त प्रश्न आहे. काही विद्वान इ. स. पूर्व ३१०२ हे वर्ष आर्यांची सत्ता प्रस्थापित झाल्याचे वर्ष समजतात. तसे धरल्यास संघर्षाचा काळ आणखी चार शतके मागे न्यावा लागेल. प्रस्तुत लेखकाच्या मते ही कालगणनेची सुरुवात संघर्षाच्या सुरुवातीपासून धरली असावी. ही कालगणना संघर्षानंतर बऱ्याच शतकानंतर तृतीय श्रेणीच्या ऋचा निर्माण झाल्या त्यावेळी कायम करण्यात आली असावी. सिंधुसंस्कृतीच्या कालगणनेवरून इ. स. पूर्व ३१०२ हा कलियुगाच्या सुरवातीचा काळ आहे असे दिसते. सुरुवातीचा काळ आहे असे मानण्यास कारण ' कली ' हे एक युग आहे. त्याची सुरवातच माहीत आहे. हाच आर्यांच्या भारतात प्रवेशाचा काळ अनुषंगाने ठरतो. ह्या कालावरून आर्यांचा भारतात प्रवेश, संघर्षाची सुरवात, सिंधु संस्कृतीचा विनाश, ऋग्वेदात संकलित केलेल्या

तृतीय श्रेणीच्या ऋचांची निर्मिती इत्यादि सर्व ऐतिहासिक घटनांची योग्य संगति लागते. ऋचांची निर्मिती सिंधुसंस्कृतीचा विनाश झाल्यावर तीन चार शतकांनी झाली. ऋचांची निर्मिती दोन तीन शतके चालली असावी म्हणजे ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचा इ. स. पूर्व २३५० ते २००० ( इ. स. पूर्व ) याकाळात निर्माण झाल्या असाव्या. तेथून चार शतके पूर्वी म्हणजे इ. स. पूर्व २७५० हा सिंधुसंस्कृतीच्या विनाशाचा काळ व तेथून साडेतीनशे वर्षापूर्वी म्हणजे इ. स. पूर्व ३१०० मध्ये संघर्षाची सुरुवात, हाच आर्यांच्या भारतात प्रवेशाचा काळ. येणेप्रमाणे सर्व घटनांची संगती लागते. व्हीलरने म्हटल्याप्रमाणे कोणताही धोका पत्करण्याची आपत्ती येत नाही.

## कलियुगासंबंधी खुलासा

कोणत्याही फार मोठ्या घटनेपासून काल मोजण्याची फार जुनी स्वाभाविक पद्धत आहे व अशा अनेक कालगणना चालू आहेत. त्यापैकी कलियुगाची कालगणना ही सर्वात जुनी आहे. कली म्हणजे कलह. ही कालगणना कलहाच्या काळापासून सुरू होते. ही कलहाची घटना सामान्य स्वरूपाची असणे संभवत नाही. ज्या कलहात हजारो लोकांच्या कत्तली झाल्या, पुरांचा नाश झाला, एका मोठ्या संस्कृतीचा विनाश झाला अशा असामान्य स्वरुपाचा हा कलह होता. ही घटना इतकी भयंकर होती की ती कोणाच्याही आठवणीतून जाण्यासारखी नव्हती. अशा ह्या भयकर स्वरूपाच्या कलहापासून कालगणना होणे स्वाभाविक आहे. ती कोणी शककर्त्याने समारंभपूर्वक ठरविण्याचे कारण नाही.

## कलियुग आणि महाभारत युद्ध

काही संस्कृत ग्रंथ व त्यांच्या आधाराने काही आधुनिक विद्वान कलियुगाचा संबंध भारतीय युद्धाशी जोडतात व ही कालगणना भारतीय युद्धाच्या शेवटापासून प्रस्थापित झाली असे मानतात. त्याचे कारण असे दिसते की सिंधुसंस्कृतीतील लोक व आर्य यांच्यातील संघर्षाची माहिती प्राचीन भारतीयांना तसेच आधुनिक विद्वानांना सिंधुउत्खननाच्या काळापर्यंत नव्हती. वैदिक विद्वानानाही उत्खननापूर्वी भारतात सिंधुसंस्कृती ही महान् संस्कृति होती व आर्यांचे प्रदीर्घ काळापावेतो सिंधुलोकांशी फार मोठे संग्राम होऊन सिंधुसंस्कृतीचा विनाश झाला याची माहिती नव्हती. त्यामुळे कलीचा संबंध सर्वांस माहीत असलेल्या महाभारतातील पौराणिक युद्धाशी जोडला जाणे स्वाभाविक आहे. प्रस्तुत संस्कृतीतील अनेक महत्वाच्या गोष्टींचे अर्थ नाहीसे झाले असले तरी आचार मात्र सातत्याने चालू आहेत हे प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविले आहे. कलियुग हा शब्दप्रयोग चालू असला तरी कलहाचे ज्ञान काळाच्या दूरपणामुळे नष्ट झाले होते. महाभारतातील घटनेच्या वास्तविकतेचा विवाद्य प्रश्न बाजूस ठेवला तरी आजच्याप्रमाणे महाभारत कालीही कलियुग हा शब्दप्रयोग कायम असून त्याचा अर्थ नष्ट झाला होता हे दाखविण्यास पुरेसा पुरावा आहे. कलीला आजच्या प्रमाणे देवाचे स्वरूप प्राप्त झाले होते हे नलोपाख्यानात कलीचे भारतात जे वर्णन आले आहे त्यावरून दिसून येईल. त्यावरून निश्चित सिद्ध होते की कलियुगाचा महाभारतातील युद्धाशी बिलकुल संबंध नाही. कली बद्दल जी कल्पना आहे तीही घोडा आणि तरवार यांच्या प्रतिकावरून युद्धाचीच आहे. सिंधुसंस्कृतीच्या कालगणनेवरून, कलियुगाच्या ज्योतिषविषयक कालगणनेवरून व कलियुगाच्या प्रचलित कल्पनेवरून कलीयुग म्हणजे आर्यांच्या आर्यपूर्वांशी संघर्षास सुरुवात असेच मानावे लागते. वरील तिन्ही परस्परांशी संबंध नसलेल्या गोष्टीवरून आर्यांचे आर्यपूर्वांशी संघर्ष इ. स. पूर्व ३१०० सालात सुरू झाले हे निश्चितपणे सिद्ध होते.





अनुक्रमणिका

डॉ. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञान : काही ठळक साम्यस्थळे

## तौलनिक विवेचनाचे प्रयोजन

एखाद्या वस्तूची दुसऱ्या वस्तूशी तुलना केल्याने तिचे खरे स्वरूप कळण्यास मदत होते. भारतीय तत्त्वज्ञानालाही हाच न्याय लागू केल्यास साहजिकच पाश्चात्य तत्त्वज्ञानाशी त्याची तुलना केल्याशिवाय भारतीय तत्त्वज्ञानाचे विवेचन पूर्ण होणार नाही, असे म्हणता येईल. पण माझा अनुभव या बाबतीत विपरीत आहे. गेल्या शंभर वर्षात आपण हीनगण्डाने पछाडलो आहोत. हा हीनगण्ड दोन प्रकारांनी व्यक्त होतो.

एक प्रकार गौरपूजेचा. पाश्चात्य हे वेगळ्या योनीत जन्मलेले अतिमानव आहेत. त्यांचे विचार कुठे व आपले कुठे ! 'क्व सूर्यप्रभवो वंशः क्व चाल्पविषया मतिः' कुठे सूर्य व कुठे काजवा तेव्हा भारतीय व पाश्चात्य या तुलनेत भारतीय ते किती क्षुद्र हे दाखवण्याखेरीज दुसरे प्रयोजन असू शकत नाही.

दुसरा प्रकार तथाकथित अभिमानाचा. आज आम्ही हीन झालो असलो तरी प्राचीनकाळी देवयोनीत होतो. आजच्या पाश्चात्यांना साध्य झालेल्या ज्ञानविज्ञानापेक्षा अधिक उच्च कोटीचे ज्ञान आमच्याजवळ होते असे प्रतिपादन करणे.

वरवर पाहिले असता ही विचारसरणी स्वाभिमानाच्या पोटी जन्मलेली आहे असे वाटते. पण तसे नाही. ही विचारसरणी देखील हीनतागण्डाचीच द्योतक आहे. आमचे प्राचीन वाङ्मय श्रेष्ठ का ? तर पाश्चात्यांचे सर्व ज्ञान त्यात आहे म्हणून. रामायणात विमानविद्या आहे म्हणून रामायण श्रेष्ठ आहे. वेदान्तात "सर्वत्र एकच शक्ति भरून राहिली आहे" हा भौतिकीचा सिद्धान्त आहे म्हणून वेदान्त श्रेष्ठ आहे. आधुनिक पाश्चात्यांच्या करामतीचे दर्शन झाल्याशिवाय ज्यांना रामायणाची वा वेदान्ताची थोरवी पटत नाही त्यांना त्याच्या थोरवीचा साक्षात प्रत्यय आला आहे असे म्हणता येत नाही. अशा प्रवृत्तीच्या लोकांना भारतीय विचार समजून घेण्याची इच्छाच नसते. कसे तरी करून भारतीय ग्रंथांवर आधुनिक शोधाचा "अध्यारोप" करण्यासाठीच त्यांचा सर्व खटाटोप असतो. या जातीच्या विवेचकांनी भारतीय तत्त्वमीमांसेच्या क्षेत्रात बराच गोंधळ उडवून ठेवलेला आहे. त्यामुळे भारतीय तत्त्वज्ञान बरोबर समजायचे असेल तर आधुनिक ज्ञान अजीबात विसरून मूळ ग्रंथांचा सहानुभूतिपूर्वक अभ्यास केला पाहिजे, असे माझे मत झाले आहे.

असे जर आहे तर भारतीय तत्त्वज्ञानाची पाश्चात्य तत्त्वज्ञानाशी तुलना करण्यास मी का प्रवृत्त झालो असे कुणी विचारील. त्याचे उत्तर असे की भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणेच पाश्चात्य तत्त्वज्ञान मी वाचले आहे व त्यामुळे काही तुलनात्मक विचार माझ्या मनात येणे अपरिहार्य आहे. हे विचार वर वर्णन केलेल्या दोन्ही प्रकारच्या गौरपूजेपासून अलिप्त ठेवण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकास ते उपयुक्त वाटतील अशी आशा आहे.

## ॲनॅक्सीमॅण्डरचे ब्रह्म

खि. पू. ५४६ च्या ॲनॅक्सीमॅण्डर नावाचा एक ग्रीक तत्त्वज्ञ होऊन गेला. त्याच्या मते सर्व पदार्थ एका नित्य, अनन्त व अजर द्रव्यापासून उत्पन्न झाले आहेत. ते ज्यातून आले त्यातच पुनः विलीन होतात. मूल अनन्त द्रव्यापासून अनेक विश्वे निर्माण होतात. आपले विश्व या अनेक विश्वांपैकी एक आहे. विश्वे क्रमाक्रमाने उत्क्रान्त किंवा विकसित होतात. एका ओल्या द्रव्यावर सूर्यप्रकाशाची क्रिया होऊन जीव निर्माण झाला. मानव माशापासून विकसित झाला.

ॲनॅक्सीमॅण्डरच्या मूलद्रव्याचे वेदान्ताच्या ब्रह्माशी साम्य आहे. एकापासून अनेक पदार्थ निर्माण झाले हे त्याचे मत "एकोऽहं बहुस्याम्" या उपनिषद्वाक्याची आठवण करून देते. सृष्ट पदार्थ पुनः मूलद्रव्यात विलीन होतात हे तत्त्व सृष्टिप्रतिसर्गाच्या वेळी प्रकृतीत विलीन होते या सांख्यांच्या तत्त्वासारखे आहे.








सांख्यांप्रमाणेच ॲनॅक्सीमॅण्डरदेखील विकासवादी आहे. पण एका प्राण्यातून दुसरा प्राणी विकसित झाला ही त्याची कल्पना सांख्यांत नाही. मनासकट इंद्रिये निर्माण झाल्यावर पुढील प्राणिसृष्टीचा क्रम सांख्यांच्या उपलब्ध ग्रन्थात विवेचिलेला नाही.

सांख्यांच्या विकासवादाची डार्विनच्या विकासवादाशी तुलना केली जाते पण या दोन विकासवादांतील साम्यापेक्षा भेद अधिक महत्त्वाचे आहेत. डार्विनचा विकासवाद फक्त प्राणिसृष्टीपुरता मर्यादित आहे. पहिला जीव प्रकृतीपासून विकसित झाला असे डार्विनने प्रतिपादलेले नाही. शिवाय खालच्या कोटीतील जीवापेक्षा वरच्या कोटीतील जीवाला विशिष्ट कार्य करणारी इंद्रिये अधिक असतात व त्यांची कार्ये अधिक परस्परसंगत असतात असे डार्विनचे मत आहे. सांख्यांचे नंतरचे द्रव्य पूर्वीच्या द्रव्यापेक्षा अधिक विविधतापूर्ण व सुसंघटित असते असे नाही. डार्विनच्या विकासवादात सांख्यांची प्रतिसर्गाची कल्पना नाही. वरच्या कोटीतील जीवाचे खालच्या कोटीतील जीवात रूपान्तर होत नाही. एकदा विकास झाला की पुनः " प्रतिविकास " होत नाही. (सृष्टीनंतर विलय व पुनः सृष्टि या चक्राची कल्पना ग्रीकांच्या स्टोइक या ग्रन्थात आढळते ). सरतेशेवटी सर्वांत महत्त्वाचा भेद हा की डार्विनच्या कल्पना पशूंच्या सांगाड्याचा प्रत्यक्ष अभ्यास करून बसवलेल्या आहेत. सांख्यांची कल्पना तर्काधिष्ठित आहे, प्रत्यक्षाधिष्ठित नाही. वेगळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे डार्विनचा विकासवाद विज्ञानाच्या कक्षेत येतो. उलट सांख्यांचा विकासवाद हा तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाचा आहे.

## पिथॅगोरसचा पुनर्जन्म

भारतीय विचारात पुनर्जन्माच्या सिद्धान्ताला फार महत्त्व आहे. मृत्यूने आत्मा मरत नाही. तो दुसरे एखादे शरीर धारण करतो. हे शरीर पशूचे देखील असू शकते. मानव व इतर प्राणी यात अनुल्लंघ्य भेद आहे. या ख्रिस्ती तत्त्वाप्रमाणे मानवाचा आत्मा पशूचा देह कधीच धारण करू शकत नाही. मृत्यूनंतर शेवटच्या निवाड्याच्या दिवशीच ईश्वर त्या आत्म्याला जागवतो.

भारतीयांचा पुनर्जन्माचा सिद्धान्त ग्रीक तत्त्वज्ञ पिथॅगोरसला देखील मान्य होता. पिथॅगोरस ख्रिस्तपूर्व ५३२ च्या सुमारास होऊन गेला. त्याच्या मते नवीन आत्मे निर्माण होत नाहीत. तोच आत्मा अनेक जन्म घेतो. सर्वच जीव एका जातीचे आहेत. पिथॅगोरस पशूंनादेखील उपदेश करीत असे. कारण त्याच्या मते पशूंत व मानवात आत्यन्तिक भेद नाही. ( पिथॅगोरस सारखाच अनुभव इतर अनेक उपदेशकांना येतो यात संशय नाही ! )

प्लेटोने देखील पुनजन्माची कल्पना उचलून धरली आहे. त्याच्या मते भित्र्या व अनीतिमान पुरुषांना स्त्रीचा जन्म मिळतो. गणिताचा अभ्यास केल्याशिवाय नुसते आकाशाकडे पाहून ज्योतिर्विद्या येईल असे समजणाऱ्या थिल्लर लोकांना पक्षाचा जन्म मिळतो, तत्त्वज्ञानरहित लोकांना हिंस्र श्वापदांचा जन्म मिळतो व मूर्ख लोकांना माशांचा जन्म मिळतो.

पिथॅगोरसच्या नंतर हीरॅक्लीटस नावाचा एक ग्रीक तत्वज्ञ ख्रि. पू. ५०० च्या सुमारास होऊन गेला. त्याच्या विचारांत भारतीय विचारांचे बरेच साम्य दिसते. त्याच्या मते आत्मा हा अग्नि व पाणी यांचे मिश्रण आहे. अग्नि हा चांगला व पाणी हा वाईट अंश आहे. ज्या आत्म्यात अग्नीचे प्राधान्य असते त्या आत्म्याला तो कोरडा म्हणतो. कोरडा आत्मा शहाणा व सर्वोत्तम असतो. ओलसर होण्याने आत्म्यांना आनंद होतो. दारूने झिंगलेला माणूस झोकाण्ड्या खात चालतो, एखादे चिमुरडे पोरदेखील त्याला खेळवू शकते. कारण त्याचा आत्मा ओला झालेला असतो. ओले होणे हे आत्म्याचे मरण होय. वासना वाईट असतात. त्या आत्म्याचा घात करतात. त्यांची सर्वथा तृप्ति इष्ट नाही.

आधुनिक वाचकाला हे उद्गार अर्थशून्य वाटतील पण उदाहरणाच्या आधारे केलेल्या तर्काचाच तो एक प्रकार आहे. ओली झालेली माती मऊ व कच्ची होते. कोरडी माती टणक व पक्की असते. माती विस्तवावर पूर्णपणे कोरडी केली की दगडासारख्या मजबूत विटा तयार होतात. हाच न्याय हीरॅक्लीटसने आत्म्याला लागू केला आहे. ओला आत्मा कच्चा व कोरडा आत्मा पक्का !








## हीरॅक्लीटस्चे सत्त्व व तम

या विचारसरणीत हास्यास्पद असे काही नाही. विज्ञानाची विचारपद्धती ही अशीच आहे. वीज हा एक पाण्याच्या प्रवाहाप्रमाणेच प्रवाह आहे अशा समजुतीने वैज्ञानिक, प्रवाहाचे गुणधर्म तिचे ठायी कल्पितो. विज्ञानाच्या व हीरॅक्लीटसच्या विचारसरणीत फरक एवढाच आहे की आपण कल्पिलेले गुणधर्म विजेत खरोखरच आहेत की नाही हे पडताळून पाहण्यासाठी वैज्ञानिक प्रयोग करून पाहतो. हीरॅक्लीटसने तसे केले नाही.

हीरॅक्लीटसची उत्तम व अधम आत्म्याची कल्पना वाचून सांख्यांच्या सत्त्व व तम या गुणांची आठवण होते. सत्त्व गुण हा प्रकाशमय व उत्तम आहे. तमोगुण हा अप्रकाशमय व अधम आहे. सत्त्व ज्ञानशील तर तम जड आहे.

सांख्यांच्या व हीरॅक्लीटसच्या कल्पनेतील फरक देखील स्पष्ट आहे. सांख्यांनी सत्त्व व तम या दोन टोकांच्या मध्ये रज नांवाचा एक तिसरा गुण कल्पिला आहे. तसेच सांख्यांचे गुण फक्त आत्म्याचेच नसून समस्त प्रकृतीचे आहेत.

हीरॅक्लीटसचे सर्वात महत्त्वाचे तत्व म्हणजे विश्वाचे प्रवाहित्व. आपण एकाच नदीत दोनदा शिरू शकत नाही. कारण नदीतले जुने पाणी वाहून सतत नवीन येत असते. त्याचप्रमाणे हे विश्व कोणत्याही दोन क्षणी तेच म्हणजे एकरूप असू शकत नाही. ते सदा बदलत असते.

या तत्त्वावरूनच बौद्धाच्या क्षणभंगवादाची आठवण होते. क्षणापेक्षा जास्त काहीही टिकू शकत नाही. विश्व म्हणजे क्षणांची मालिका, ही कल्पना बौद्धांनी चांगली सूक्ष्मपणे मांडली आहे. वरवर पाहता तोच दिसणारा पुरुष प्रतिक्षणी नवीन श्वास घेतो व जुना बाहेर टाकतो. तो प्रतिक्षणी अधिक म्हातारा होत असतो. बदलत नाहीसा दिसणारा दगड प्रतिक्षणी वाऱ्याच्या घर्षणाने झिजत असतो, त्यावरची जुनी धूळ उडून नवीन बसत असते.

## पार्मीनाइडसचे ब्रह्म

हीरॅक्लीटसच्या क्षणिकवादाच्या विरुद्ध पार्मीनाइडसचे तत्त्वज्ञान आहे. पार्मीनाइडस ख्रिस्तपूर्व ४५० च्या सुमारास झाला. त्याच्या मते अनंत व भेदरहित असे एकच तत्त्व सत्य आहे. ते कधीही बदलत नाही. ते वर्तुलाकार व सर्व ठिकाणी सर्वात्मना भरून राहिले आहे. ते बदलू शकत नाही. कारण बदलणे म्हणजे जे आहे ते नाहीसे होणे. ते उत्पन्न होऊ शकत नाही कारण जे आहेच ते उत्पन्न कसे होणार ?

पार्मीनाइडस्च्या वरील विचाराचे एकमेवाद्वितीय भेदरहित अनंत ब्रह्माच्या कल्पनेशी फार साम्य आहे. त्याचे एक तत्व ब्रह्मासारखे आनंदरूप नाही. ते "गोल" आहे. ते बदलू शकत नाही. कारण बदलणे म्हणजे आहे ते नाहीसे होणे या युक्तिवादावरून "नाभावो विद्यते सतः" सताचा अभाव संभवत नाही या गीतावाक्याची आठवण होते. गीता असताची उत्पत्ति होऊ शकत नाही — नासतो विद्यते भावो –– असे म्हणते. पार्मीनाइडस् याउलट सताची उत्पत्ति होऊ शकत नाही असे म्हणतो. पण हा विरोध वरवरचा आहे. जे सत आहे ते उत्पन्नही होत नाही व नाशही पावत नाही, ते नित्य आहे हा दोघांचाही भावार्थ आहे.

पार्मीनाइडस् नंतर ख्रि. पू. ४४० च्या सुमारास एम्पीडोक्लस नांवाचा एक तत्वज्ञ होऊन गेला. याच्या मते जगातील सर्व पदार्थ माती, अग्नि, वायु व पाणी यांचे निरनिराळया प्रमाणात मिश्रण झाल्याने उद्भवले आहेत. मिश्रण प्रेमाच्या साहाय्याने होते. द्वेषाच्या प्रभावाने मिश्रित पदार्थ वेगळे होतात.

एम्पीडोक्लसच्या चार मूलतत्त्वात आकाशाची भर घातली की वैशेषिकांची पंचमहाभूते होतात. पाच इंद्रियांना पाच प्रकारचे ज्ञान होते. म्हणून वैशेषिकांनी पाच मूलतत्त्वे मानली आहेत. एम्पीडोक्लसची कल्पना अशी नाही. शिवाय प्रेम व द्वेष यांच्यामुळे संयोजन वियोजन होते अशी वैशेषिकांची कल्पना नाही. ईश्वरेच्छेमुळे अणूंचे संयोजनवियोजन होते असे उत्तरकालीन नैयायिक मानत.

## ग्रीक परमाणुवाद

परमाणूंच्या गतीबद्दल ग्रीक तत्वज्ञानात एक मजेदार कल्पना आहे. जड अणू जोराने खाली पडतात व हलके अणु हळू पडतात. त्यामुळे जलद पडणारे अणु



अनुक्रमणिका








हलूं पडणाऱ्या अणूंवर आदळतात. अशा रीतीने अणूंचा संयोग होतो.

डेमॉक्रीटस हा ग्रीक परमाणुवादाच्या आद्य संस्थापकांपैकी एक आहे. तो खि. पू. ४३२ च्या सुमारास होऊन गेला. त्याला परमाणूंच्या गतीची वरील उपपत्ति मान्य नव्हती. त्याच्या मते परमाणु हा पदार्थांचा अन्तिम घटक आहे. परमाणूला भाग असले तरी ते वेगळे केले जाऊ शकत नाहीत. म्हणजे परमाणु फोडला जाऊ शकत नाही. आकार व महत्ता यांच्या भेदाने परमाणूंचे अनंत प्रकार होतात. खाली व वर या संज्ञांना भूगोलावर अर्थ असला तरी खगोलात अर्थ नाही. कारण खाली म्हणजे पृथ्वीजवळ व वर म्हणजे पृथ्वीपासून दूर. उलट चंद्रावरच्या माणसाच्या दृष्टीने खाली म्हणजे चंद्राजवळ व दूर म्हणजे चंद्रापासून दूर असा अर्थ होईल. तेव्हा परमाणु खाली पडतात म्हणजे अंतराळातील असंख्य गोलांपैकी कोणत्या गोलाकडे जातात असे समजायचे ?

परमाणूत क्रिया होते ती खाली वा वर पडण्यामुळे होत नसून कवडशात तरंगताना दिसणाऱ्या असंख्य धूलिकणांच्या गतिप्रमाणे यदृच्छेने होते.

डेमॉक्रीटसच्या परमाणुवादाचे कणादाच्या परमाणुवादाशी साम्य सुस्पष्ट आहे. मात्र कणादाचे परमाणु निरवयव आहेत, नुसतेच अभेद्य नाहीत. परमाणूंबद्दल कवडशातील धूलिकणांची उपमा वैशेषिकांनीदेखील वापरली आहे.

ॲनॅक्सीमॅण्डर व सांख्य यांची विकासाची कल्पना जशी पुढे डार्विनच्या विकासवादात सापडते तसाच कणाद व डेमॉक्रीटस यांचा परमाणुवाद आधुनिक विज्ञानात अवतीर्ण झाला आहे. डार्विनच्या विकासवादात व ग्रीक वा सांख्यांच्या विकासवादात ज्याप्रमाणे जमीन-अस्मानाचे अंतर आहे त्याचप्रमाणे कणादाच्या वा ग्रीकांच्या परमाणुवादात व आधुनिक विज्ञानाच्या परमाणुवादात जमीन अस्मानाचे अंतर आहे. हे अंतर विज्ञानाच्या प्रत्यक्षनिष्ठेमुळेच पडले आहे. कणादाचा परमाणुवाद ही एक कल्पना आहे. उलट वैज्ञानिक कोणत्या पदार्थात कोणते परमाणु आहेत व त्यांची रचना कशा प्रकारे झालेली आहे हे प्रत्यक्ष प्रयोगाच्या आधारे ठरवतो. त्यामुळे पदार्थांचे विभजन करून घटक पदार्थ मिळवणे व परमाणूंचे संयोजन करून नवीन पदार्थ बनवणे वैज्ञानिकाला शक्य झाले आहे. ते ग्रीकांना वा वैशेषिकांना शक्य नव्हते.

## अरिस्टॉटलचे न्यायशास्त्र

डेमॉक्रीटसनंतर जे अनेक ग्रीक तत्त्वज्ञ होऊन गेले त्यांत सॉक्रेटीस, प्लेटो व अरिस्टॉटल या रथीमहारथींचा समावेश होतो. या तत्त्वज्ञांच्या विचाराच्या सदृश विचार भारतीय दर्शनातून काढून दाखवता आले तरी ज्या मध्यवर्ती कल्पनाभोवती त्यांचे तत्त्वज्ञान गुंफलेले आहे तशाच कल्पनांना मध्यवर्ती कल्पून एखादे दर्शन भारतात प्रसृत झालेले दिसत नाही.

अरिस्टॉटलने संवाक्याचा (syllogism) विचार केला. त्या संवाक्याचे नेहमीचे उदाहरण असे —

सर्व मानव मर्त्य आहेत.
सॉक्रेटीस हा मानव आहे.
∴ सॉक्रेटीस मर्त्य आहे.

न्यायदर्शनात अनुमान वाक्याचा विचार आहे. हे अनुमानवाक्य वरील संवाक्यापेक्षा थोडे भिन्न आहे. याचे नेहमीचे उदाहरण असेः–

या पर्वतावर वह्नि आहे. कारण तेथे धूम आहे. जेथे जेथे धूम असतो तेथे तेथे वह्नि असतो. उदाहरणार्थ चुलीत, हा पर्वत चुलीसारखाच आहे म्हणून त्यावर चुलीप्रमाणेच वह्नि आहे.

ॲरिस्टॉटलच्या व न्यायाच्या अनुमानविचारात मुख्य फरक हा आहे की अरिस्टॉटल हेत्वाभासांचा विचार करताना अनुमानातील विधाने सर्व व्यक्तींबद्दल आहेत की काही व्यक्तींबद्दल आहेत याचाच मुख्यतः विचार करतो. सर्व मानव मर्त्य आहेत म्हणून सॉक्रेटीस मर्त्य आहे हे अनुमान बरोबर. उलट काही मानव काळे आहेत म्हणून सॉक्रेटीस काळा आहे हे अनुमान चूक.

न्यायाने हेत्वाभासाचा विचार करताना या एकाच तत्त्वाचा अवलंब केलेला नाही. न्यायाने सांगितलेल्या आश्रयासिद्ध या हेत्वाभासाचा प्रकार तर रसेलने अरिस्टॉटलच्या अनुमानविचारातील उणीवा दाखवताना










ज्या हेत्वाभासाचे उदाहरण दिले आहे त्यासारखा आहे. रसेल म्हणतो--

१. सर्व सुवर्णपर्वत हे पर्वत असतात.

२. सर्व सुवर्णपर्वत सोन्याचे असतात.

३. म्हणून काही पर्वत सोन्याचे असतात.

या अनुमानाचे काही पर्वत सोन्याचे असतात हे निगमन अरिस्टॉटलच्या तर्कशास्त्राप्रमाणे खरे मानावे लागेल. कारण या अनुमानात त्याला कोणतीच चूक दाखवता येणार नाही. शिवाय त्यांची आधारभूत १ व २ ही वाक्ये खरी आहेत. पण काही पर्वत सोन्याचे असतात हे खरे नाही. मग या अनुमानात चूक कुठे आहे

चूक हीच की सुवर्णपर्वत अस्तित्वात असतात असे एक वाक्य पहिल्या वाक्यात दडलेले आहे. हे वाक्य खोटे आहे म्हणून त्यावर आधारलेले सारे अनुमान चुकीचे आहे.

न्यायाने अगदी असेच मत मांडले आहे "आकाशाला लागणारे फूल सुगंधि असते, कारण सर्वच फुले सुगंधि असतात" हे अनुमान चूक आहे. कारण आकाशकुसुम हे कुसुम आहे असे मानण्यात आकाशकुसुम अस्तित्वात असते असे चुकीचे विधान मानावे लागते.

## डायोजिनीसचा तपस्यावाद

ॲरिस्टॉटलनंतरचे ग्रीक तत्त्वज्ञान निवृत्तिवादाने ग्रासलेले आहे. या कालात ग्रीसचे सैनिक व राजकीय वर्चस्व नाहीसे होत होते. निवृत्तिवाद बौद्धधर्मदेखील याच कालात जगावर प्रभाव गाजवू लागला होता. ॲन्टिस्थीन्सचा शिष्य डायोजिनीस हा निवृत्तवाद्यामध्ये प्रसिद्ध आहे. गुरूने काठीने झोडपले तरी याने आपला ज्ञानप्राप्तीचा हट्ट सोडला नाही म्हणून गुरूची त्यावर कृपा झाली. डायोजिनीस एखाद्या फकीरासारखा रहात असे. सारे ऐहिक सुखोपभोग तुच्छ आहेत. सारे मायापाश सोडले पाहिजेत. फक्त पुण्यशीलता हेच जीविताचे एकमेव मूल्य आहे अशी त्याची शिकवणूक होती. तो एका टबात राहात असे. एकदा अलेक्झांडर त्याला भेटायला गेला व "आपल्याला काही हवे काय?" म्हणून त्याने विचारले. तेव्हा "तुझ्यामुळे माझे ऊन अडते आहे तेवढे जरा मोकळे सोड" असे त्याने उत्तर दिले हे प्रसिद्ध आहे.

डायोजिनीसचे विचार व आतल्याकडील संन्यासमार्गातल्या वैराग्य वगैरे कल्पना यांचे साम्य स्पष्ट आहे.

डायोजिनीस नंतर खिस्तपूर्व २३५ च्या सुमारास टिमन् नावाचा एक तत्त्वज्ञ होऊन गेला. याच्या मते अनुमानाने काहीच सिद्ध होऊ शकत नाही. कारण सॉक्रेटीस मर्त्य आहे हे सिद्ध करायला सर्व मानव मर्त्य आहेत हे सिद्ध व्हायला पाहिजे व हे सिद्ध करणे अशक्य आहे. आपल्याकडे चार्वाकाचे देखील असे म्हणणे होते. धूमावरून वह्नीचे अस्तित्व अनुमानाने सिद्ध व्हायला जेथे जेथे धूम आहे तेथे तेथे वह्नि आहे ही "व्याप्ति" सिद्ध व्हायला पाहिजे. पण अशी व्याप्ति सिद्ध होऊ शकत नाही.

## अर्सेसिलासचे खंडनखंडखाद्य

टिमन्च्याच काळी अर्सेसिलास नावाचा एक तत्त्वज्ञ होऊन गेला. त्याचे म्हणणे असे होते की युक्तिवादाने काहीही सिद्ध करता येते. काहीही खरे किंवा खोटे ठरवता येते. श्रीहर्षाने आपल्या खंडनखंडखाद्यात असेच मत मांडले आहे. कोणत्याही विधानाचे मी खंडन करून दाखवतो अशी त्याची प्रतिज्ञा होती. त्याला खंडन हेच खंडखाद्य म्हणजे खडीसाखरेसारखे रुचकर वाटत होते.

खिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या थोडे नंतर सेक्सटस एंपिरिकस नावाचा एक नास्तिक होऊन गेला. त्याने निरीश्वरवादी युक्तिवाद म्हणून एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात ईश्वर सर्वशक्तिमान् असेल तर जगातील वाईटाबद्दल तो जबाबदार आहे असे मानावे लागेल असे प्रतिपादन आहे हा शांकरभाष्यात वर्णिलेला वैषम्यनैर्घृण्याचा प्रसंग आहे. शंकराचार्यांनी हा प्रसंग ईश्वर कर्मानुसार फल देतो असे म्हणून सोडवला आहे. एम्पिरिकसच्या मते असे म्हटल्याने ईश्वराच्या सामर्थ्यास मर्यादा पडतात, फल देण्यास तो स्वतंत्र नाही असे ठरते.

ख्रिस्तपूर्व ३४२ च्या सुमारास एपीक्यूरसचा जन्म झाला. एपीक्यूरसचे तत्त्वज्ञान सुखवाद म्हणून प्रसिद्ध आहे. सुख हेच त्याच्या मते जीविताचे ध्येय आहे. सुख याचा अर्थ भौतिक सुख असाच त्याने स्पष्टपणे केला आहे. भौतिक सुखात देखील शृंगारासारख्या क्षोभकारक सुखापेक्षा मैत्रीसारखी शान्त सुखे तो अधिक श्रेष्ठ समजत असे.












## एपीक्यूरसचा सुखवाद

एपीक्यूरसची मते "यावज्जीवेत् सुखं जीवेत्" या चार्वाकांच्या उद्‌गाराची आठवण करून देतात. पण एपीक्यूरस चार्वाकांप्रमाणे- निरीश्वरवादी नव्हता. देव मानवी व्यवहारात लक्ष घालीत नाहीत तेव्हा त्यांच्या रागलोभाचा विचार करण्याचे कारण नाही एवढेच त्याचे म्हणणे होते.

खिस्तोत्तर २०४–७० या कालात प्लोटायनस् नावाचा एक ग्रीक तत्त्वज्ञ होऊन गेला. याच्या विचारांचे वेदान्ताशी बरेच साम्य आहे. एक, नाउस व आत्मा ही त्याच्या दर्शनातील तीन तत्त्वे आहेत. एकाचे ब्रह्माशी बरेच साम्य आहे. ते सताच्या पलीकडे, ईश्वरी, शिव व सुन्दर आहे. पण हे वर्णनही फारसे बरोबर नाही कारण ते एक निर्गुण आहे. त्याचे विशेषणांनी वर्णन होऊ शकत नाही. ते सर्वठिकाणी आहे व कुठेही नाही. त्याचे खरे वर्णन मौनाने होते. वक्तृत्वाने नव्हे.

नाउस म्हणजे चैतन्य. आत्मा द्विविध आहे. एक चैतन्यमय व अन्तर्दर्शी आहे. दुसरा बहिर्मुख आहे. हा बहिर्मुख आत्माच इंद्रियांना दिसणारी सृष्टि निर्माण करतो.

१५९६ ते १६५० या काळात डेकार्ट्स नावाचा एक तत्त्वज्ञ होऊन गेला. आधुनिक तत्त्वज्ञानाचा जनक म्हणून डेकार्ट्स प्रसिद्ध आहे. त्याने भक्कम व अविचाल्य पायावर तत्त्वज्ञानाची उभारणी करायचे ठरवले. हा पाया कोणता? ज्याच्याबद्दल संशयच निर्माण होऊ शकत नाही असे तत्त्व कोणते? डेकार्ट्सच्या मते सगळयाच तत्त्वांच्या अस्तित्वाबद्दल शंका घेता येते. पण आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल शंका घेता येत नाही. शंका घेतली तर कोण कोणाबद्दल शंका घेतो म्हणायचे? जो शंका घेतो तोच आत्मा. मी आहे की नाही असा विचार जो करतो तोच आत्मा. I think therefore I am. (Cogito ergo sum) हे डेकार्टस्चे वाक्य प्रसिद्ध आहे.

वेदान्तात देखील आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल-असा युक्तिवाद आढळतो. "संशयितेव भवसि त्वम्!" संशय घेणारा तोच तू. मी आहे असाच सर्वांचा अनुभव आहे. मी नाही असा कोणाचाच अनुभव नाही. म्हणून आत्मा अस्तित्वात आहे.

## स्पिनोझाचा वेदान्त

१६३२–७७ या कालात स्पिनोझा नांवाचा एक तत्त्वज्ञ होऊन गेला. त्याच्या मते विचार व परिणाम हे दोन्ही ईश्वराचे गुण आहेत. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे जड व चेतन ही दोन्ही ईश्वराची स्वरूपे आहेत. जगातील अनंत वस्तु स्वतंत्र नाहीत. त्या ईश्वराच्या विशेषणरूप आहेत. रंग, सुगन्ध वगैरे गुण ज्याप्रमाणे फुलात असतात त्याचप्रमाणे या वस्तु ईश्वरात असतात. ईश्वराशी सायुज्य पावणे हेच अमरत्व. मानवी मनाला ईश्वराच्या नित्य व अनंत स्वरूपाचे ज्ञान असते. पण वासनांच्या प्रभावाने हे ज्ञान मलिन होते.

स्पिनोझाच्या विचारांचे वेदान्ताच्या मताशी साम्य स्पष्ट आहे. जगत् हे ईश्वराचे शरीर आहे असे रामानुजाचे मत आहे. पंचमहाभूते हे ब्रह्मावरचे तरंग आहेत. विवर्तायस्यैते विद्यनिल तेजोऽववनयः। असे वाचस्पतीचे वचन आहे. मात्र मायावादाप्रमाणे विवर्त हा तरंगासारखा सत्य नसून भ्रमस्वरूप असतो. जीव हा ईश्वरावरचा तरंग आहे. तो ईश्वराचा आहे पण ईश्वर त्याचा नाही. सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः। हे वचन प्रसिद्ध आहे. आत्म्याला ब्रह्मज्ञान स्वभावतः असते व सायुज्य हेच अमरत्व ही वेदान्ताचीही तत्त्वे आहेत.

या तत्त्वापेक्षाही वेदान्ताचे प्रसिद्ध तत्त्व मायावाद हे आहे. युरोपीय तत्त्वज्ञांत या मायावादाचे दर्शन बर्कलेच्या (१६८५–१७५३) लिखाणात होते. बाह्य जगाचे ज्ञान इंद्रियसंवेदनांनी होते पण या इंद्रियसंवेदनांव्यतिरिक्त बाह्य जग म्हणून काही आहे याला प्रमाण सापडत नाही. अर्थात अस्तित्वात असणे म्हणजे संवेद्य असणे. पण असे मानल्यास मी डोळे मिटल्याने रूपमय जगत् नाहीसे होते असे मानावे लागेल. या प्रसंगातून सुटका होण्यासाठी बर्कलेने ईश्वराची कल्पना केली. मी पाहत नसलो तरी ईश्वर सदा पाहत असतो म्हणून जग नेहमी अस्तित्वात असते.

वेदान्ताची ईश्वरकल्पना अशी नाही. जगाचे सत्यत्व म्हणजे ईश्वराला होणारा भास हे वेदान्ताला मान्य नाही. ईश्वराला भास झाला म्हणून तो सत्य ठरत नाही. जग हा सर्वस्वी भासच आहे. आत्मा हेच सत्य आहे.












## ह्यूम व शॉपेनहोर : नैरात्म्य व निराशा

बर्कलेनंतर ह्यूम नांवाचा एक तत्त्वज्ञ १७११-७६ या कालात होऊन गेला. हा नैरात्म्यवादी होता. संवेदना, भावना व विचार यांच्या मालिकेच्या पलीकडे आत्मा नांवाचे एखादे द्रव्य आहे हे त्याला मान्य नव्हते. हे त्याचे मत आत्मा म्हणजे क्षणिक अनुभूतीचे सन्तान वा प्रवाह या बौद्धांच्या मतासारखे आहे.

बौद्धांची नैरात्म्यवादाप्रमाणेच निराशावादासाठी देखील प्रसिद्धी आहे. निराशावाद हा १७८८-१८६०च्या दरम्यान झालेल्या शॉपेनहोर या जर्मन तत्त्ववेत्त्याच्या लिखाणात प्रकर्षाने आढळतो. किंबहुना बौद्ध व औपनिषदिक तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाने प्रभावित होऊनच शॉपेनहावरने आपले विचार बनवले होते. भारतीय तात्त्विक विचारांच्या प्रभावामुळे अमुक विचार पाश्चात्य तत्त्वज्ञानात प्रादुर्भूत झाला असे शॉपेनहोरच्या तत्त्वज्ञानाच्या बाबतीत जेवढे निश्चितपणे म्हणता येते तेवढे प्राचीनकाळच्या युरोपीय तत्त्वज्ञानाच्या बाबतीत म्हणता येत नाही. कारण विचारसाम्य पुष्कळ आढळले तरी परस्पर प्रभावाचा साक्षात् पुरावा आढळत नाही.

शॉपेनहोर म्हणतो की जग दुःखमय आहे व तसेच राहणार. इच्छांच्या पूर्तीमुळे दुःखाचा क्षणिक निरास झाला तरी पुनः नव्या इच्छांचे दुःख असतेच. जीवन हा प्रतिक्षणी टळणारा मृत्यू आहे. सर्व संसाराच्या मुळाशी वासना आहे. वासना क्षीण केल्या की सारे मायाजाल दूर होते. ही शून्याची किंवा निर्वाणाची अवस्था आहे.

भारतीय व पाश्चात्य दर्शनातील चटकन लक्षात येणाऱ्या साम्यस्थळांचा येथपर्यंत उल्लेख केला. या दोन्ही दर्शनांचा अभ्यास करणाऱ्यांना एक गोष्ट जाणवते व ती म्हणजे भारतीय दर्शनात नीतिशास्त्राचा विचार नाही. महाभारतात प्रसंगानुरोधाने धर्म व अधर्म यांची चर्चा आहे पण सदाचार व दुराचार या नीतीतील मूलभूत कल्पनांचे तार्किक विश्लेषण भारतीय दार्शनिकांनी केलेले आढळत नाही.

आढळत नाही हे म्हणणे केलेच नाही या म्हणण्यापेक्षा अधिक सयुक्तिक आहे. कारण जेवढे संस्कृत वाङ्मय लिहिले गेले त्याच्या शतांशदेखील आज उपलब्ध नाही. जे उपलब्ध आहे ते प्रातिनिधिक आहे, असेही म्हणता येत नाही. कारण उत्तरकालीनांना ज्यात रस वाटत नाही ते वाङ्मय लुप्त होते. भारतीयांना उत्तरोत्तर मोक्षप्रद वाङ्मयाखेरीज कशातही राम वाटेनासा झाला हे प्रसिद्ध आहे.

## ज्ञान सर्व एक आहे

तौलनिक अभ्यासकाच्या दृष्टीस येणारा दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे अमुक एक विचार भारतीय पिण्डाचा व दुसरा पाश्चात्य पिण्डाचा असे म्हणता येत नाही हे होय. दोन्ही तत्वज्ञानात बहुतेक सर्व प्रकारचे विचार येऊन गेलेले आहेत. भारतीय तत्त्वज्ञान अध्यात्मप्रधान होते व पाश्चात्य तत्त्वज्ञान जडवादी आहे हे मत निराधार आहे. सॉक्रेटीस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, डेकार्टस् बर्कले, काण्ट व हेगेल या पाश्चात्य दार्शनिकातील रथीमहारथींना जडवादी हे विशेषण लागू होणार नाही. शिवाय पाश्चात्यात प्रभावी असलेला खिश्चन धर्म, परलोकवादी व संन्यासमार्गी आहे. तेव्हा भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञान या वर्णनाला केवळ भौगोलिक अर्थ आहे.

—



अनुक्रमणिका

प्रा. राजनारायण मौर्य : अनु. एम्. बी. शहा

# भाषा आणि बोली

एकच भाषा जर दोन निरनिराळया व्यक्तींकडून उपयोगात आणली जात असेल तर भाषाशास्त्रज्ञांच्या मतानुसार तिच्या उपयोगात स्पष्ट अंतर असते. एखादी भाषा जर हजारो, लाखो लोकांकडून बोलली जात असेल, तर तिच्या उपयोगात निश्चितपणे फरक जाणवतो, हा फरक सामाजिक व आर्थिक परिस्थितीमुळे होत असतो. सामाजिक अथवा आर्थिक कारणांमुळे ज्या लोकांत रात्रंदिवस विचारांची देवाण घेवाण होत असते त्यांच्या भाषाप्रयोगात साधारणतः एकच प्रवृत्ति पहावयास मिळते. ज्यांना आपल्या विचारांची देवाण-घेवाण करण्याची वेळ क्वचितच येते अशा लोकांच्या भाषाप्रयोगात मात्र खूप अंतर असते.

जेथे एका विस्तृत भूभागाच्या एका फार मोठ्या समूहाकडून, एकाच भाषेच्या आधाराने विचार-विनिमय होत असतो, तेथे विचारविनिमयाच्या माध्यमाला भाषा म्हणतात; परंतु त्या भाषेच्या अंतर्गत लहान लहान समूहांकडून त्या भाषेशी साम्य ठेवणारी जी भाषा बोलली जाते तिला बोली म्हणतात.

प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ 'मेरिओ पाई' (Mario Pei) ने बोलीची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे :

"बोली म्हणजे एखाद्या भाषेचे एका निश्चित भूभागात किंवा भौगोलिक क्षेत्रात बोलले जाते ते स्वरूप. त्या भाषेच्या प्रमाणभूत किंवा साहित्यिक स्वरूपात आणि ह्या बोली भाषेत खूप अंतर असते. हे अंतर उच्चारण, व्याकरण आणि वाक्प्रचार व म्हणी यांच्या प्रयोगात असते. त्यामुळे बोलीचे वेगळे अस्तित्व प्रगट होते. परंतु त्या भाषेच्या अन्य बोलींपेक्षा अधिक अंतर नसते की ज्यामुळे ती एखादी स्वतंत्र भाषा मानली जाईल." [१]

प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ. ग्रियर्सननी भाषा आणि बोली यातील अंतर स्पष्ट करताना लिहिले आहे की "भाषा आणि बोली यामधील संबंध हा टेकडी व पर्वत यांच्यातील संबंधासारखा आहे. एव्हरेस्टला आपण निःसंकोचपणे 'पर्वत' व 'हॉलवार्न' ला टेकडी म्हणू शकू. परंतु ह्या दोघांच्या मधली विभाजन रेखा निश्चितपणे दाखविणे कठीण आहे. पण कधी कधी आपण सात हजार पाचशे फूट उंच असलेल्या दार्जिलिंगला टेकडी व तीन हजार पाचशे फूट उंच असलेल्या 'स्नोडन' ला पर्वतही म्हणतो. भाषा आणि बोली यांचा उल्लेखही साधारणतः अशाच शिथिलतेने केला जातो.' [२]

भाषा आणि बोली यांमध्ये खरे म्हणजे जे मुख्य अंतर आहे ते हे की एका भाषेत ज्या विभिन्न बोली असतात त्यात पुष्कळशा प्रमाणात समानता असते आणि त्या भाषेत बोलणारे त्या सर्व बोली सहजतेने समजू शकतात. कुठलीही एक विशिष्ट भाषा बोलणारा साधारणतः त्या भाषेच्या बोलींचा अभ्यास केल्याशिवाय त्या स्वाभाविकरीत्या बोलू शकतो. दुसरी भाषा शिकण्याकरिता मात्र विशेष श्रमाची व अभ्यासाची आवश्यकता असते. मराठी भाषाभाषी 'कोकणी' किंवा 'खानदेशी' व हिंदी भाषाभाषी 'भोजपुरी' ला किंवा 'बांगरू' ला अभ्यासाशिवाय सहज समजू शकतो. परंतु बंगाली किंवा उडिया भाषेला परिश्रमाशिवाय समजणे अशक्यच ! या दृष्टीने बोलीचे 'पारस्परिक बोधगम्यता' हेच एक असे तत्त्व आहे की ज्यामुळे बोली व भाषा ह्यातला फरक लक्षात येऊ शकतो. डॉ. ग्रियर्सनना मात्र हे तत्त्व मान्य नाही. ते लिहितात :

"भाषा आणि बोली यातील अंतर स्पष्ट करण्याकरिता आम्ही पारस्परिक बोधगम्यतेचा सिद्धान्त स्वीकारणे बरोबर होणार नाही. कारण तथाकथित हिंदीच्या ह्या बोलींचे भाषाशास्त्रज्ञ जेव्हा परीक्षण करतो व त्यांचे वर्ग करण्याचा प्रयत्न करतो तेव्हा त्यांचे वाक्प्रचार व घडण ह्यात तात्त्विक अंतर सापडते. ह्यातल्या काही बोली इंग्रजीप्रमाणे विश्लेषणात्मक आहेत तर दुसऱ्या जर्मन भाषेप्रमाणे संश्लेषणात्मक आहेत. काहींचे व्याकरण अत्यंत सुबोध व सरळ असून वाक्यात शब्दांचा पारस्परिक संबंध, शब्दरूपे व धातुरूपे ह्यांच्या द्वारे प्रकट न होता सहायक शब्दांच्या उपयोगानेच प्रकट होतो. परंतु ह्यात

१. डिक्शनरी ऑफ लिंग्विस्टिक्स, पृष्ठ ५६.

२. भारतका भाषा सर्वेक्षण– अनु० डॉ. उदयनारायण तिवारी. पृ. ४२



अनुक्रमणिका

काही बोली अशाही आहेत की ज्यांचे व्याकरण लॅटिनपेक्षाही किचकट असून तीत क्रियेचे रूप केवळ कार्यानुसारच परिवर्तित न होता कार्यानुसार सुद्धा बदलले जाते. भाषाविज्ञानाच्या दृष्टीने ह्या सर्व बोलींना एकाच भाषेच्या बोली मानणे म्हणजे जर्मन भाषेला इंग्रजी भाषेची बोली मानण्याइतके विसंगत आहे ![3]

डॉ. ग्रियर्सनच्या मतानुसार भाषा आणि बोली यांच्यात व्याकरणात्मक साम्य असेल तरच तिला विशिष्ट भाषेची बोली म्हणता येते. जर प्रत्येकाची व्याकरणात्मक रचना वेगवेगळी असेल तर त्या एकाच भाषेच्या बोली असू शकत नाहीत.

डॉ. ग्रियर्सन उदाहरणादाखल लिहितात : " गोरखपूरच्या शेतकऱ्याची भाषा झाशीच्या जंगलात राहणाऱ्याला कळो वा न कळो, पण त्याची भाषा अत्यंत संश्लिष्ट असून तिच्या क्रियापदांची रूपे लॅटिनपेक्षाही अधिक किचकट आहेत हे सत्य मान्य करावे लागेल. ह्या उलट झाशीच्या जंगलात राहणारा मनुष्य जिचे व्याकरण मुळीच संश्लिष्ट नाही अशा एका साध्यासोप्या भाषेचा प्रयोग करतो. तिच्या क्रियापदात केवळ एक " काळ " आणि दोन कृदन्ताचाच तेवढा उपयोग होत असतो. इतर 'काळां'ची निर्मिति कृदंत आणि सहाय्यक क्रियेच्या सहाय्याने होत असते. दोन्ही ठिकाणच्या शेतकऱ्यांचा शब्दसमूहही सारखा असू शकतो. परंतु एका भाषेच्या व्याकरणाची रचना दुसरीपेक्षा पूर्णपणे वेगळी आहे. ह्या अवस्थेत भाषाशास्त्राच्या दृष्टीने ह्या बोलींना कुठल्याही एका भाषेच्याच बोली सांगणे अनुपयुक्त होय. '[4]

पारस्परिक बोधगम्यतेच्या आधारावर विभिन्न बोलींमध्ये समानता शोधण्याचा सिद्धान्त डॉ. ग्रियर्सनंनी आणखी एका विचाराच्या साहाय्याने चुकीचा गृहीत धरला आहे. तो विचार म्हणजे जातीयता आणि साहित्य ! एक भाषा जवळच्या दुसऱ्या भाषेशी इतकी मिळतीजुळती असते की दोन्ही भाषाभाषी एकमेकांची भाषा सहज समजू शकतात, पण त्यांची जातीय वैशिष्ट्ये व त्यांचे साहित्य भिन्न असेल तर अशा अवस्थेत त्या दोन्ही भाषांना कुठल्याही एका भाषेच्या बोली कसे म्हणता येईल ?

डॉ० ग्रियर्सनंनी असामिया आणि बंगाली भाषेची उदाहरणे देत लिहिले आहे :

" आज लोक 'असामिया'ला एक स्वतंत्र भाषा मानतात. परंतु जर तिच्या व्याकरणाचे रूप व शब्दसमूह ह्यांचा विचार केला तर ती बंगाली भाषेची एक 'बोली भाषा' आहे हे नाकारणे अशक्य होईल. ह्याबाबतीत ती निश्चितपणे शुद्ध बंगालीशी त्याच रूपाने संबंधित आहे की ज्या रूपाने तिच्याशी चटगावची साधारण व्यवहारोपयोगी बंगाली संबंधित आहे. आणि तरीही असामिया एक स्वतंत्र भाषा आहे, तिला स्वतःचा इतिहास आहे, सुंदर साहित्य आहे, केवळ एका स्वतंत्र जातीची भाषा म्हणूनच नव्हे तर शैली आणि विषय ह्यांच्या दृष्टीने सुद्धा ती बंगालीभाषेहून वेगळी आहे. अशा प्रकारे आपल्याला येथे अशा एका भाषेचे उदाहरण सांपडते की जिच्यात पारस्परिक बोधगम्यतेचा अभाव नाही. परंतु जातीयता आणि साहित्य ह्या दृष्टीने मात्र अंतर आहे. "[5]

डॉ. ग्रियर्सन बोलींची पारस्परिक बोधगम्यता मान्य करीत नाहीत. काही अंशापर्यंत हे बरोबरही आहे. असामिया आणि बंगाली यांचे उदाहरण आपण पाहिलेच. त्याचप्रमाणे पंजाबी आणि खडीबोली-( हिंदी ) तही पारस्परिक बोधगम्यता हिंदीच्या अन्य बोलींप्रमाणेच आहे. पण त्या एक दुसरीच्या बोली-भाषा नाहीत किंवा दुसऱ्या कोणत्याही भाषेच्या बोली नाहीत दोन्ही स्वतंत्र भाषा आहेत. दुसरीकडे एकाच भाषेच्या दोन बोलींमध्ये बरेच अंतर असलेले देखील आढळून आले आहे. भोजपुरीभाषी 'बांगरु' ला किंवा गढवाली 'बुंदेली'ला चांगल्या प्रकारे कितपत समजू शकतील ह्यात शंका आहे. तरीही त्या एकाच भाषेच्या बोली आहेत.

डॉ. ग्रियर्सनंनी भाषेच्या व्याकरणाची एकसंधता व जातीय समानता ह्यांच्या आधारावर बोलींची एकता स्वीकारली आहे. परंतु भाषेच्या क्रियात्मक प्रक्रियेत

---

३. भारतका भाषा सर्वेक्षण अनु. उदयनारायण तिवारी पृ. ४४.

४. भारतका भाषा सर्वेक्षण - डॉ. उदयनारायण तिवारी. पृ. ४४

५. भारतका भाषा सर्वेक्षण- अनु उदयनारायण तिवारी. पृ. ४४



अनुक्रमणिका







हेही बरोबर वाटत नाही. 'मेरिओपेई' ने आपल्या परिभाषेत हे स्पष्ट केले आहे की बोली व भाषा यात जे अंतर असेल ते उच्चारण, व्याकरणाची रचना, आणि वाक्प्रचारांचा प्रयोग, ह्यात असते. व्याकरण-विषयक भिन्नतेशिवाय कोणतीही बोली कुठल्याही विशिष्ट भाषेपेक्षा भिन्न कशी असेल ? फक्त शब्दसमूहाच्या साहाय्याने ही भिन्नता जाणणे शक्य नसते. पण एवढे निश्चित की सदर बोलीच्या व्याकरणाची रचना त्याच भाषेच्या अन्य बोलींपेक्षा इतकी वेगळी असत नाही की तिला एक वेगळी भाषा मानणे भाग पडावे. भाषा आणि तिची बोली ह्यांच्या व्याकरणाच्या रचनेत पूर्ण साम्य नसते, पूर्ण भिन्नताही नसते. दोहोतही फक्त काही गोष्टी समान असतात. मोठ्या स्थूल नियमांमध्ये कसलाही फरक असत नाही. पण म्हणून काही व्याकरण-रचनेचे साम्य किंवा भिन्नता हे भाषेचे किंवा बोलीचे मुख्य लक्षण ठरू शकत नाही. माझ्या मते राजस्थानीत आणि गुजरातीत व्याकरणाची रचना जवळजवळ सारखीच आहे. तरीपण त्या एकाच भाषेच्या बोली नाहीत. कारण त्यांच्यात पारस्परिक बोधगम्यतेचा अभाव आहे. म्हणून बोलींच्या बाबतीत पारस्परिक बोधगम्यता नुसती महत्वपूर्ण आहे असे नव्हे तर ती आवश्यकही आहे.

बोलींच्या लक्षणात मुख्यतः चार गोष्टी आवश्यक असतात. त्यापैकी पारस्परिक बोधगम्यता व्याकरणाची रचना आणि जातीय एकता ह्यांची चर्चा वर केलेलीच आहे. चौथी महत्वपूर्ण गोष्ट म्हणजे ऐतिहासिक समानता. कुठल्याही बोलीवर कुठल्याही भाषेचा प्रभाव पडलेला असो, परंतु जर तिचा इतिहास इतर भाषेशीं संबद्ध असेल तर ती त्याच भाषेची बोली ठरेल. राजस्थानीचे उदाहरण वर दिलेलेच आहे. गुजरातीचा तिच्यावर अधिक प्रभाव असूनही तिचा इतिहास हिंदीशी संलग्न आहे; गुजरातीशी नव्हे. नेपाळी भाषा विज्ञानाच्या दृष्टिकोनातून हिंदीची एक बोली असूनही ऐतिहासिक विभिन्नतेमुळे ती एका स्वतंत्र भाषेच्या रूपाने विकसित होत आहे.

## बोलींची उत्पत्ति व त्यांच्या सीमा

बोलींची उत्पत्ति सामाजिक आर्थिक समूह व भौगोलिक सीमा यांच्या आधारावर होते. एका प्रदेशातील रहिवाशांमध्ये लहान लहान सामाजिक व आर्थिक गट तयार होतात. गावाच्या जवळ एक लहानसा बाजार असतो. चारसहा मैलांच्या चौफेर परिसरातील लोक दैनिक व्यवहाराला लागणाऱ्या वस्तू विकत घेण्याकरिता तेथे येत असतात. अशा प्रकारे जवळ जवळ पंचक्रोशीच्या क्षेत्रातील लोक दररोज आपापसात भेटत असतात. त्यांच्यात विचारांची देवाणघेवाण होत असते. अशा प्रकारे त्यांचा एक आर्थिक गट तयार होतो. ह्या बाजारापासून दुसऱ्या पंचक्रोशीत दुसरा बाजार आहे. तेथेही त्या परिसरातील लोक येऊन त्यांचाही 'आर्थिक गट' तयार होतो. एका आर्थिक गटाच्या भाषेची प्रवृत्ति दुसऱ्या आर्थिक गटाच्या भाषिक प्रवृत्तीपेक्षा भिन्न असणे स्वाभाविक आहे. अशा प्रकारे मोठ्या औद्योगिक नगरात एक मोठा 'आर्थिक गट' निर्माण होऊ शकतो.

एक तीर्थस्थान आहे. तेथे चारी बाजूंच्या २०।२५ मैलांवरून लोक ये–जा करीत असतात. त्यांच्यात विचारांची देवाणघेवाण होत असते. अशा प्रकारे जवळजवळ १०० चौरस मैलाच्या परिसरात एक 'सामाजिक गट' निर्माण होतो. अशाच प्रकारच्या दुसऱ्या सामाजिक गटाच्या भाषेत व ह्या गटाच्या भाषेत अंतर असणेही स्वाभाविक आहे. विवाह, यात्रा, सभा, समारंभ ह्यांच्यामुळेही अशा प्रकारचे 'सामाजिक गट निर्माण होतात.

भौगोलिक सीमांमुळे सुद्धा भाषेत फरक पडतो. जर काही गावापर्यंतच वाहनांची रहदारी असेल, त्याच्या-पुढे नदीमुळे किंवा पर्वतामुळे रहदारी बंद झाली असेल, तर दोन्ही बाजूंकडे वेगवेगळे गट तयार होतात. प्रत्येक गटाचे सामाजिक सांस्कृतिक कार्य स्वतःपुरतेच मर्यादित रहाते. दोन्ही गटांचा संबंध अगदी कमी येतो. प्रत्येक गटाच्या भाषेत स्वाभाविकरीत्या फरक पडतो. शिक्षणामुळेही वेगवेगळे गट बनतात. शिक्षितांची भाषा अशिक्षितांपेक्षा भिन्न होऊन जाते. मात्र शिक्षित लोकांच्या भाषेत अशिक्षितांपेक्षा फार कमी फरक पडतो हे निश्चित. काशीचे आणि लखनौचे शिक्षित लोक एकाच तऱ्हेची हिंदी बोलतात. पण दोन्ही ठिकाणच्या अशिक्षित लोकांच्या भाषेत जमीनअस्मानाचे अंतर आहे. ह्याचे कारण शिक्षित लोक एकाच प्रकारच्या भाषेचा अभ्यास करीत असतात. समाजातील उच्चवर्गीय लोकांच्या भाषेत फार कमी अंतर








असते. कारण हे लोक सतत लांबचा प्रवास करीत असतात व त्याच वर्गाच्या लोकांशी त्यांचा अधिक संपर्क असतो. त्यांच्या आचारविचाराचे क्षेत्र संकुचित न राहाता विस्तृत बनत जात असते. उलट मध्यम आणि खालच्या वर्गातील लोकांचा संबंध साधारणतः गांव व आसपासच्या भागांशीच राहतो. एका मर्यादित क्षेत्रात यांच्या आचारविचारांची देवाण-घेवाण होत असते.

अशा प्रकारे निरनिराळया गटांच्या भाषेत भिन्नता असल्यामुळे वेगवेगळया बोली निर्माण होतात. जवळपासच्या काही गटांच्या भाषेत पुष्कळसे साम्य आढळल्यामुळे त्यांना एका वेगळया बोलीची संज्ञा प्राप्त होते. येथे एक प्रश्न स्वाभाविकरीत्या उभा राहतो. आधी एकादी प्रमाणभाषा असून नंतर वेगवेगळया गटांच्यामुळे वेगवेगळया प्रवृत्ति निर्माण होऊन त्यांच्या आधारावर बोलींची उत्पत्ती होते का ? १८ व्या शतकातील युरोपिअन वैय्याकरणांचे असे मत होते की 'साहित्यिक आणि उच्चवर्गीय प्रमाण भाषा, स्थानिक बोलींपेक्षा प्राचीन असते, ती सर्वसाधारण लोकांच्या अज्ञानामुळे व निष्काळजीपणामुळे तयार होते '[६] परंतु हे विधान असत्य आहे. स्थानिक बोलींमुळेच प्रमाण किंवा साहित्यिक भाषा निर्माण होत असते. प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ ब्लूमफील्डने अनेक उदाहरणे देऊन हे सिद्ध केले आहे.

'ऐतिहासिक भाषाशास्त्राचा विकास हे दाखवितो की प्रमाणभाषा कितीही प्राचीन असो, ती स्थानिक बोलींमुळेच काही विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीत विकसित झालेली असते. उदा० प्रमाण इंग्रजी प्राचीन साहित्यिक इंग्रजीचे आधुनिक रूप नव्हे परंतु लंडनची जी प्राचीन स्थानिक बोली आहे, तिने प्रथम प्रांतिक रूप धारण केले व नंतर ती राष्ट्रीय पातळीवरून विकसित होत गेली. ह्या दरम्यान तिने स्थानिक व प्रांतीय बोलींवरून अनेक रूपे ग्रहण केली. '[७]

अशा प्रकारे अनेक बोलींमधलीच एकादी बोली विशिष्ट सामाजिक आणि एतिहासिक परिस्थितीत विकसित होऊन प्रमाण भाषा बनते. ह्यासंबंधी दुसरे मत असे की, प्रमाण किंवा साहित्यिक भाषेशी अपरिचित असल्यामुळे विभिन्न भाषाप्रकारांचा विकास होत जातो व पुढेपुढे हाच प्रकार त्या भाषेच्या बोलींच्या रूपाने व्यवहारात येतो. उदाहरणार्थ इंग्रजी भाषेचा– लंडनच्या प्रमाण इंग्रजीचा– अमेरिकेत दुसऱ्याच एका स्वरूपात विकास झाला. आम्ही त्याला 'अमेरिकन इंग्लिश' म्हणतो. प्रमाण आणि साहित्यिक हिंदीचेही स्थानभेदानुसार नागपुरी, हिंदी, बंबई, हिंदी, इत्यादि प्रकार दिसून येतात. भविष्यकाळात त्यांचा विकास हिंदीच्या बोलीच्या रूपाने होण्याची शक्यता आहे.

बोलींच्या सीमा निर्धारित करणे व त्यांचे वर्गीकरण करणे हे एक कठीण कार्य आहे. प्रत्येक गटाच्या भाषेत थोडेफार अंतर असते हे सत्य आहे, परंतु त्यांच्यामधली सीमारेषा निश्चितपणे निर्धारित करणे अशक्य ! एक गट जर एकाद्या आर्थिक गटाहून वेगळा असेल, व दुसऱ्या सामाजिक गटाशी संबद्ध असेल तर त्यातले काही सदस्य त्या आर्थिक गटाशीही संबंधित असू शकतील.

दोन आर्थिक गटांच्या प्रदेशांच्या सीमा जेथे मिळतात तेथे एक सामाजिक गट सहज निर्माण होतो. अशा प्रकारे दोन वेगवेगळया गटांच्या भाषांच्या प्रवृत्ती मधल्या सामाजिक गटात एकत्र येतात. म्हणून आपण दोन विभिन्न प्रवृत्ती असलेल्या भाषांच्यामध्ये अचूक सीमारेषा आखू शकत नाही. अशा प्रकारे एका बोलीचे लोक दुसऱ्या बोलीच्या क्षेत्रात येत जात असतात. त्यांच्या सामाजिक संबंधामुळे शब्दांची व त्यांच्या रूपांची देवाणघेवाण चालू राहते. अशा परिस्थितीत दोन्ही क्षेत्रातल्या काही गोष्टीत साम्य असणे स्वाभाविक आहे. कधी कधी एकाद्या ठिकाणी वेगवेगळया बोलींच्या सीमा येऊन मिळतात. ते ठिकाण कोणत्या बोलीच्या क्षेत्रात ठेवावे हे ठरविणे कठीण जाते. तसे पाहता भौगोलिक सीमारेषा, विशिष्ट जाती, किंवा संस्कृति, ह्या भाषिक सीमेचे निर्धारण करण्यात साहाय्यक होऊ शकतात. परंतु हे विभाजन अचूक ठरू शकत नाही. पर्वत आणि नद्या भाषेला अनुल्लंघनीय नाहीत. प्रयागच्या पश्चिमेला गंगेच्या दोन्ही किनाऱ्यावर खूप लांबपर्यंतच्या बोलीत फरक सापडत नाही. काही स्थानिक भाषाप्रयोगात थोडेफार अंतर अवश्य सापडते. संस्कृतीच्या आधारावर ही सीमारेषा बरोबर निश्चित होऊ शकत नाही.

६. लँग्वेज, पृ. ३२१.

७. लँग्वेज, पृ. ३२१.

कारण जाती स्थानान्तर करू शकतात आणि संस्कृतीचा परिसरही विस्तृत-संकुचित होत असतो. म्हणून स्पष्ट रूपाने सीमारेषा निर्धारित करणे सोपे नाही. डॉ. ग्रियर्सननाही ह्या अडचणीचा अनुभव आला होता. एके ठिकाणी त्यानी लिहिले आहे की – "ज्यावेळी मी पूर्वेकडील हिंदी भाषेचे संशोधन करीत होतो त्याचवेळी प्रो. स्टेनकोनो 'मराठी' भाषेचे संशोधन करीत होते. आपापल्या स्वतंत्र पद्धतीने काम करीत असताना आम्ही दोघे अशा एका प्रदेशात एकत्र आलो की जेथे 'हलबी' नावाची एक विचित्र मिश्रित बोली प्रचलित होती. पूर्वेकडील हिंदीच्या दृष्टिकोनातून विचार करताना मी तिला मराठी भाषेचेच एक रूप गृहीत धरले, तर त्याच्या नेमके विरुद्ध, मराठीचा चष्मा लावून डॉ. कोनोनी तिला पूर्वहिंदीचाच एक प्रकार म्हणून मान्यता दिली."[८]

बोलीच्या व भाषेच्या वर्गीकरणात अशा प्रकारे इतर अनेक प्रश्न येतात. भाषावार प्रांतरचनेच्या वेळी अशी अनेक स्थाने निघाली की ज्यांच्या भाषेचे रूप अजूनपर्यंत निश्चित ठरू शकले नाही.

बोलींचे सीमानिर्धारण व त्याचे वर्गीकरण ही एक मोठी समस्या आहे. हे सत्य असले तरी पूर्वी दिलेल्या बोलींच्या लक्षणासंबंधी तत्त्वाधारे ह्या समस्येची उकल होऊ शकते. पारस्परिक बोधगम्यता, व्याकरणाची रचना, जातीयता व ऐतिहासिकता ह्यांना समोर ठेवले तर एका निश्चित भूभागाच्या भाषेत एखादी विशिष्ट प्रवृत्ति दिसून येईल व हीच विशिष्ट प्रवृत्ति बोलीला जवळपासच्या दुसऱ्या बोलींपासून किंवा भाषेपासून पृथक् असल्याचे सिद्ध करील. ही प्रवृत्ति आसपासच्या दुसऱ्या भाषामध्ये आढळण्याची सुद्धा शक्यता आहे. पण ती एवढी स्पष्ट असणार नाही व तिचे प्रमाणही कमी असेल.

## बोली अध्ययनाचे सिद्धान्त

आधुनिक काळात बोलींच्या अध्ययनाचे तीन सिद्धान्त प्रचलित आहेत. (१) बोलींचा शब्दकोश (२) बोलींचे व्याकरण व (३) बोलींचे मानचित्र.

पहिला सिद्धान्त सर्वात जुना आहे. विभिन्न बोलीचे शब्द किंवा त्यांच्या काही रूपांचे कोश त्यांची ठळक वैशिष्ट्ये जाणून घेण्यात सहाय्यक होऊ शकतील. 'शब्द-समूहा'तले अंतर, बोली व भाषा या दृष्टीनी एक महत्त्वपूर्ण अंतर आहे. ह्या शब्दकोशांच्याद्वारे ध्वनींचे उच्चारण, शब्दांचे अर्थपरिवर्तन, इत्यादींचे ज्ञान चांगल्या प्रकारे होते, व त्यामुळेच प्रमाण किंवा साहित्यिक भाषा व बोली ह्यांच्यातला फरक स्पष्टपणे ज्ञात होतो. शब्दांचे रूप व व्युत्पत्ति यानी त्या बोलींच्या मूळ परिवाराची कल्पना करता येते. एकाच प्रकाराचे शब्द व त्यांच्या रूपांचा प्रयोग सीमा निर्धारणास सहाय्यक होतात.

कुठल्याही भाषेच्या किंवा बोलीच्या अध्ययनाचा मूळ आधार म्हणजे तिचे व्याकरण होय. शब्दसमूहामुळे कुठल्याही बोलीविषयी कमी माहिती मिळते. भारतीय आर्यभाषांचे शेकडा ५० टक्के शब्द दुसऱ्या भाषेत सापडतात. तर हिंदीच्या बोलींमधले अर्ध्याहून अधिक शब्द सगळ्या भाषेत सापडतात. खरे पाहता बोलीबोलींमधले अंतर स्पष्टपणे जाणण्याची व बोली ओळखण्याचा मुख्य आधार तिचे व्याकरणच होय. ह्या गोष्टीची चर्चा वर केलेलीच आहे की बोली किंवा भाषा व बोलीबोलीतला फरक व्याकरणाच्या रचनेच्या आधारावरच नीट स्पष्ट केला जाऊ शकतो. बोलीच्या व्याकरणाच्या रचनेच्या सिद्धांताद्वारेच ती कुठल्या मूळभाषेपासून विकसित झाली, तिच्यात काय व किती फरक पडला, तिच्या आधीच्या भाषेच्या सीमा व रूपरेखा काय होत्या हे स्पष्ट होऊ शकते. मानचित्रांच्या आधारे बोलीच्या सीमा निश्चितपणे जाणता येतात. प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ ब्लूमफील्डच्या मते 'कुठल्याही स्थानिक बोलीच्या संपूर्ण व सुव्यवस्थित वर्णनाव्यतिरिक्त बोलींच्या वर्गीकरणाकरिता मानचित्र हा सर्वात स्पष्ट व सर्व श्रेष्ठ मार्ग होय.'

एका प्रमाण भाषेच्या अंतर्गत बोलींची मानचित्रे, बोलींचे मूळकेंद्र, विस्तार, अन्यबोलींमुळे प्रभावित झालेला भाग, फारच स्पष्टपणे प्रकट करू शकतात.

'डायलेक्ट ॲटलास' मध्ये बोलींच्या इतर अनेक वैशिष्ट्यांविषयी ज्ञान प्राप्त होते.

---

८. भारतका भाषा सर्वेक्षण– उदयनारायण तिवारी. पृ. ५५.








## वाचकांचा पत्रव्यवहार —

### ' कामधेनूचे दुभते '

फेब्रुवारी ६४ च्या अंकात ( नवभारतच्या ) श्री. अर्जुनवाडकर यांनी कै. द. व्यं. केतकरांशी भिन्न मत प्रतिपादताना ' दुभते ' या शब्दाच्या अर्थावर विस्तारपूर्वक लिखाण केले आहे. पण त्यात दुभत्याचा मूळ अर्थ सुटलेला दिसतो. ज्ञानेश्वर ज्या परिसरात वाढते आणि त्यांनी ज्ञानेश्वरी लिहिली; त्या परिसरात ' दुभते ' हा शब्द आजही नाम आणि विशेषण या दोन्ही प्रकारे उपयोगात येतो. दुभती म्हैस, दुभती गाय किंवा दुभते जनावर असा विशेषणाचा उपयोग होतो व गायीचे दुभते, म्हशीचे दुभते असा नामाचा उपयोग होतो. या उपयोगातच अर्थाचा आशय आला आहे. त्यासाठी जागा अडविण्याचे कारण नाही.

वादविषय झालेल्या ओवीत या दुभत्याचा आशय नामाच्या रूपाने योजिला आहे. दुभते म्हणजे नुसते दूध नव्हे. कामधेनू ही सर्व इच्छा पुरवणारी असल्याने, ज्याला तिचे दुभते सुदैवाने लाभले त्याच्यात इच्छांचीच वाण असावी काय ? असा त्या ओवीचा मथितार्थ आहे. दुभते जर साध्या गायीचे आणि म्हशीचे असते तर कामना फक्त दूध आणि तद्जन्य अन्य पदार्थांपुरतीच मर्यादित झाली असती. परंतु जेथे कामधेनूच दुभत्याचे कारण आहे, तेथे कामनाची वाण असणे किंवा करणे हे युक्त नव्हे. म्हणजेच श्रीकृष्णासारखा सर्वज्ञ सांगणारा असताना अर्जुनाने एकाद दुसरा प्रसंग आणि प्रश्न या पुरती आपली जिज्ञासा मर्यादित करून जिज्ञासेचा अभाव दाखविणे युक्त नव्हे. या प्रसंगाने येथे एक सुचवावेसे वाटते ते हे की, ज्ञानेश्वरीतील पाठभेदाच्या व अर्थचर्चेच्या प्रयत्नात मराठवाडा आणि खानदेश यातील भाषाविशेषांची मदत घेतल्यास अवास्तव चर्चांचा विस्तार मूळ धरू शकत नाही.

— भा. रं. कुलकर्णी

### (२)

### ज्योतिष पद्धति

नवभारताच्या फेब्रुवारीच्या अंकात श्री. प्र रा. देशमुख यांचा ' सिंधुसंस्कृति आणि आर्यांच्या भारतातील प्रवेशाची कालगणना ' ( पूर्वार्ध ) हा लेख प्रसिद्ध झाला आहे. लेखाचा पूर्वार्धच फक्त प्रसिद्ध झालेला असला तरी ' ज्योतिष पद्धती ' बद्दल त्यांत केलेल्या विधाना व्यतिरिक्त पुढे अधिक विवेचन करण्याचा लेखकाचा मानस दिसत नाही म्हणून या विधानाबद्दल दोन शब्द लिहितो.

( १ ) ज्योतिष पद्धतीचे प्रणेते म्हणून लो. टिळक व प्रा. याकोबी यांचा उल्लेख करून ज्योतिष पद्धतीप्रमाणे वेदकाल खि. पू. १०००० ते २०००० ठरतो असे म्हटले आहे. वस्तुतः टिळक व याकोबी यांच्या मते वेदकाल खि. पू. ६००० ते ४००० आहे. वीस ते दहा हजार नव्हे.

( २ ) ऋचा हा ज्योतिषग्रंथ नसला तरी वेदाङ्ग ज्योतिष हा ज्योतिषग्रंथ आहे. त्यात 'प्रपद्यन्ते श्रविष्ठादौ सूर्याचन्द्रमसावुदक । ' असे स्पष्ट वाक्य आहे. शिवाय शतपथ ब्राह्मणांत ' कृत्तिका प्राच्यै दिशो न च्यवन्ते । सर्वाणि हवा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते । असे निःसन्दिग्ध वाक्य आहे. या वाक्यांच्या अर्थाबद्दल वाद शक्य नाही. देशमुखांनी वेदकालासंबंधीच्या ज्योतिषविषयक प्रमाणांची चर्चा करणारे लिखाण वाचण्याची तसदी घेतल्याचे दिसत नाही.

देशमुखांच्या या व पूर्वीच्या लेखात पुष्कळच भाकडकथावजा विधाने आहेत. त्यांचे लेख पूर्ण झाल्यावर जरूर वाटल्यास पुढे त्यांचा समाचार घेऊ.

— नी. र. वऱ्हाडपांडे

# सार-संकलन

## " मागासलेल्या देशांमध्ये विज्ञानाचा मागासलेपणा "

" भुकेलेल्या माणसास तुम्ही जर एक चांगला मासा दिला तर त्याच्या एकाच दिवसाची वेगमी होईल. परंतु त्याला जर मासे कसे धरावे याचे शिक्षण दिले तर त्याची जन्माची तरतूद कराल. "

– एक चिनी म्हण

[ स्वीडन मधील पदार्थविज्ञान व समाजशास्त्र या विषयांच्या विद्यापीठांचे संबधित पंडित डॉ. स्टीव्हन डेडीजेल हे पदार्थविज्ञान शास्त्राचे नामवंत संशोधक आहेत. यानी भारत, डेन्मार्क, अमेरिका व स्वीडन या देशातील वैज्ञानिक प्रगतीच्या धोरणाचा अभ्यास करून वरील शीर्षकाखाली प्रा. एडवर्ड शिल्स यानी संपादिलेल्या 'मिनर्व्हा' या त्रैमासिकाच्या १९६३ च्या शारदीय अंकात सविस्तर अहवाल देऊन परामर्श घेतला आहे– ]

मागासलेल्या आशियाई व आफ्रिकन देशातील विकास-प्रयत्नातील विज्ञान संशोधनाची किती उपेक्षा होत आहे याचे आकडे-वारीने कोष्टक दिले आहे. या कोष्टकात जगातील अत्यंत सुधारलेली मोठी राष्ट्रे व विकासप्रयत्न नियोजनपूरक करणारी मोठी परंतु मागासलेली राष्ट्रे घेऊन १९६० सालची आकडेवारी दिली आहे. ही राष्ट्रे एकूण २४ आहेत, त्यात भारत, चीन, पाकिस्तान सारखे देश घेतले आहेत. त्या कोष्टकावरून असे सिद्ध होते की विकासप्रयत्नांचा ध्यास लागलेल्या भारतासारख्या मागासलेल्या देशात विज्ञानसंशोधनाच्या बाबतीत भयंकर हेळ-सांड होत आहे. अत्यंत पुढारलेल्या देशातील एका मोठ्या विज्ञानवेत्याने खाजगी रीतीने लिहि-लेल्या एका पत्रातील संदर्भावरून ही गोष्ट सूचित केली आहे. त्या पत्रात असे म्हटले आहे की, " मागासलेल्या या महान राष्ट्राचे प्रधानमंत्री विज्ञानाचा महिमा ओळखतात ही गोष्ट विश्रुत आहे. परंतु या प्रधानमंत्र्याची भूमि विज्ञानाच्या वाढीचा मुरब्बी शत्रू आहे, असेच वाटायला लागते. " नंतर प्रस्तुत लेखक म्हणतो की, या मागासलेल्या देशातील यात्रेत भेटलेले अनेक तरुण वैज्ञानिक निराशावादाने घेरलेले सापडतात. या वैज्ञानिकांच्या तोंडची वाक्ये अशी आहेत– " माझ्या देशाला माझी किंवा कोणत्याही विज्ञान-पंडिताची कदर नाही " किंवा " माझ्या सरकारला विज्ञानाचा तिटकारा आहे. "

या विस्तृत अहवालाचे तात्पर्य असे की, या मागासलेल्या राष्ट्रातील विद्यमान सांस्कृतिक वाता-वरण हे विज्ञानपूर्व युगातील संस्कृतीचा वारसा आहे. हे वातावरण येथील संस्था, आर्थिक व्यवहार राजकारण, मनःस्थिति व सांस्कृतिक प्रयत्न यांच्यात पुरेपूर भरून राहिले आहे, विकसित देशातील तंत्र व विज्ञान आपल्या देशात आणण्याचा प्रयत्न सत्ताधारी राज्यकर्ते करतात. विदेशी विज्ञान व तंत्र यांच्यापासून आपल्या देशाच्या विकासप्रयत्नांना फायदा व्हावा या करिताही ते झटतात. परंतु खाजगी, सार्वजनिक किंवा सरकारी पातळीवरील औद्योगिक, शेतकीविषयक, कारखान-दारी विषयक वा शैक्षणिक संघटनांना स्वदेशी विज्ञानसंशोधनाची जोड दिल्याशिवाय विकास-प्रयत्न दुर्बल व अल्प फलद होतील, याचा उत्कट प्रत्यय उद्योगपतींना शैक्षणिक क्षेत्रातील नेत्यांना किंवा सत्ताधाऱ्यांना नाही, असा अनुभव पदोपदी येतो. नियोजनांचा निर्णय व मार्गदर्शन मुख्यतः केन्द्रीय सत्तेकडूनच होते, स्थानिक पातळीवरील नियोजनाला आधारभूत असणारे वैज्ञानिक संशोधन जवळजवळ शून्यवत् आहे. स्थानिक नियोजनास अनुकूल वा प्रतिकूल परिस्थितीचा विषयवार संख्यासिद्ध अभ्यास व्यवस्थित रीतीने होत नाही. स्थानिक गरजांचा विचार होतो, स्थानिक शक्तींचा विचार होत नाही. जमीन कशी आहे, नैसर्गिक अनुकूल साधने कशी



अनुक्रमणिका








आहेत, हवामान, वनस्पति, पशू, साधनसामग्री, माणसांची प्रकृति व संस्कृति याचे भूमिविज्ञान, खणिविज्ञान, वनस्पतिविज्ञान, प्राणिविज्ञान इत्यादि विज्ञानांच्या आधारे तपशीलवार वैज्ञानिक संशोधन करण्याची आवश्यकता लोकनेत्यांना व सरकारला भासत नाही. जुने ग्रह, जुन्या श्रद्धा, सामाजिक व राजकीय आकांक्षा याची पकड अशा संशोधनाच्या प्रयत्नास अत्यंत प्रतिकूल आहे. विशेषतः राजकीय नेत्यांना स्थानिक संशोधनातून जी सत्ये बाहेर पडतील त्यांच्या योगाने आपले महत्त्व, आपल्या आशा आकांक्षा आणि अविचारपूर्वक दिलेली आश्वासने यांना धोका पोचेल अशीही भीती साधार वाटत असते.

ज्या थोड्या राजकीय व सांस्कृतिक नेत्यांना विज्ञान व तंत्र हे अद्ययावत् स्वरूपात नियोजन —प्रयत्नाशी सतत निगडित राहिले पाहिजे असे वाटत असते त्यांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की, विकसित देशातील विज्ञान व तंत्र हे नुसते उसने आणून भागणार नाही, त्याला स्वदेशीय व स्थानिक विज्ञानसंशोधनाची सतत जोड दिली पाहिजे, त्यांचा सजीव संबंध निर्माण केला पाहिजे. त्यांच्यात साद व प्रतिसाद सुरू होईल याची दक्षता बाळगली पाहिजे. असे घडले नाही तर विकासप्रयत्नात ते देश मागासलेलेच राहतील व मागासलेपणाचा अवनतीकडे ओढणारा वेग कधीही थांबणार नाही. विज्ञानसंशोधनाला मागासलेल्या देशातील परिस्थिति, मनोभूमि व संस्थात्मक यंत्रणा अत्यंत प्रतिकूल आहे याची जाणीव होणे ही गोष्ट संशोधनाची पहिली आवश्यकता आहे.

विकसित देशात विज्ञान विकास होत आहे, कारण त्या समाजातील कमीजास्त प्रमाणात स्वायत्त असलेले तीन महत्त्वाचे सामाजिक विभाग होत, हे राजकीय नेत्यांनी विज्ञानविषयक धोरणे आखताना लक्षात घेतले पाहिजे. हे तीन सामाजिक विभाग तयार करणे अत्यंत आवश्यक अशी बाब आहे. विज्ञानाच्या वाढीस खालील तीन सामाजिक विभाग अमेरिका, पश्चिमी राष्ट्रे व सोव्हिएट युनियन यामध्ये तयार झालेले दिसतात. ते असे—

(१) प्रशिक्षण, संशोधन आणि प्रचार करणाऱ्या व वैज्ञानिक परंपरेवर अधिष्ठित असलेल्या स्वतःच्या संस्थांनी बनलेला वैज्ञानिकांचा समाज. (२) राजकीय नेते व सरकारी कर्मचारी यांनी बनलेली शासकीय यंत्रणा; ही यंत्रणा विज्ञान विषयाला वाहिलेली असते, विज्ञानाला महत्त्व देते, विज्ञानाच्या वाढीत योग्य अशी तरतूद करते; विज्ञानाचा दूरगामी परंतु व्यावहारिक उपयोग ओळखून त्याचे बौद्धिक महत्त्व स्थापित करण्याचा प्रयत्न करते; या यंत्रणेने केवळ विज्ञानप्रयत्नांचे कौतुक किंवा प्रशंसा केली तरी विज्ञानप्रयत्नांना हुरूप येतो. (३) औद्योगिक, व्यापारी, कृषिविषयक, शैक्षणिक, वैद्यकीय, लष्करी व अन्य प्रकारच्या विज्ञानाचा महिमा ओळखणाऱ्या व विज्ञान आत्मसात् करण्यास सतत उत्सुक असणाऱ्या संस्था; या वैज्ञानिकांचा समाज व शासन यांच्याकडून व्यवहार्य साहाय्याची अपेक्षा बाळगीत असतात.

वरील तीन प्रकारच्या सामाजिक विभागांचा मागासलेल्या राष्ट्रातील जीवनावर प्रभाव पडत नाही. किंबहुना अशा सामाजिक विभागांच तुरळक अस्तित्वच अशा राष्ट्रांमध्ये असते. मागासलेल्या राष्ट्रांमध्ये स्वतःचे असे विज्ञान नाही ही गोष्ट त्यांच्या दारिद्र्य व कंगाली इतकीच भयानक आहे. जगाच्या १२० राष्ट्रांपैकी १५ ते ३० राष्ट्रांमध्येच, लोकसंख्येच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे एक तृतीयांश लोकसंख्येमध्ये जगाचे सगळेच विज्ञान समावलेले आहे. जगातील ९५ टक्के संशोधनांवर हीच राष्ट्रे जास्तीत जास्त शक्तिव्यय करतात. संशोधनपर लेख, तांत्रिक अहवाल, नवे शोध, नवी शास्त्रीय उपकरणे, नव्या शास्त्रीय प्रक्रिया आणि नवे विज्ञानात व तंत्रात






प्रशिक्षित कार्यकर्ते यांची मुख्यतः निर्मिति याच देशांमध्ये होते. त्यामुळे वैज्ञानिक संशोधनाचा मानवी संस्कृतीस होणारा फायदा आर्थिक, राजकीय व सामाजिक क्षेत्रात याच देशांच्या वाट्यास येतो.

जगातील सुमारे १०० राष्ट्रे मागासलेली म्हटली जातात. या राष्ट्रांमध्ये जगाची दोन तृतीयांश लोकसंख्या वास करते. विज्ञानाचा विशेषार्थ ध्यानात घेता ही राष्ट्रे विज्ञानशून्य होत असे म्हणणे भाग पडते. असा डा. स्टीव्हेन डेडीजेल नामक स्वीडनमधील पदार्थविज्ञानवेत्त्याने काढलेला निष्कर्ष आहे. त्याने आपल्या लेखाच्यावर प्रारंभी उद्धृत केलेली चिनी म्हण दिली आहे ती मागासलेल्या देशातील लोकनेत्यानी नित्य लक्षात ठेवावी अशी आहे.

## सोव्हिएट रशियातील आर्थिक प्रगतीची मंदावलेली गति

[ साप्ताहिक 'मँचेस्टर गार्डियन'च्या जानेवारी ३०, १९६४ च्या अंकात या संबंधात पुढील मजकूर आला आहे ]--

गतवर्षी सोव्हिएट युनियनमध्ये औद्योगिक उत्पादन शेकडा ८½ टक्याने वाढले, असा मास्कोचा अहवाल प्रसिद्ध झाला आहे. परंतु ( CIA ) सेंट्रल इंटिलिजिन्स एजन्सीच्या अहवालाप्रमाणे रशियाची वर्तमान वार्षिक आर्थिक वाढ २½ टक्यानेच होत आहे. या दोन अहवालामध्ये अत्यंत मोठी तफावत आहे. निःपक्षपाती पश्चिमी तज्ञांच्या मते ही वार्षिक वाढ १९५० ते १९५८ पर्यंतच्या कालखंडात ६·८ इतकीच ठरते. यात माल व लोकोपयुक्त कामे यांचा अंतर्भाव होतो. या कालखंडात १० टक्के वाढ होत होती, असा रशियनांचा दावा आहे. याबाबतीत ही गोष्ट निश्चित आहे की, या कालखंडातील रशियाची वाढ अमेरिकेच्या वाढीपेक्षा खास कमी नव्हती. ( CIA ) सेंट्रल इंटिलिजिन्स एजन्सीचे म्हणणे प्रचारकी थाटाचे आहे असे दिसते, असे म्हटले तरी ते विचारात घेणे आवश्यक आहे. ( CIA ) चा युक्तिवाद असा की, गतवर्षीचा कृषिविषयक पेचप्रसंग या संकटाचा एक भाग होय. उद्योगधंद्यांत मोठ्या वाढीची शक्यता लक्षात घेऊन भांडवल गुंतवणीच्या बाबतीत चुकीची वाटणी करण्यात आली. ही वाटणी अंशतः लष्करी उद्देशानी झाली. त्यामुळे बिनलष्करी विभागातील उत्पादनवेगाला ताण बसला. रासायनिक आणि यांत्रिक साधने अल्पप्रमाणात आहेत अशा स्थितीत त्याचा लचका संरक्षणाने तोडला. त्याचा उलटा ताण सोव्हिएट आर्थिक व्यवस्थेला वाढत्या प्रमाणात भोवला. यात कृषिविभागही येतो. नागरिकांच्या उपभोगाच्या साधनांना महत्त्व देण्याची जरूरी असल्यामुळे हा ताण अधिक जाणवत आहे. कोणी असेही दर्शित करतात की, अमेरिकेत १९६१–६२ मध्ये संरक्षण उभारणीच्या प्रयत्नाला जोर आल्यामुळे रशियन अर्थव्यवस्थेवर विशेष ताण पडला. कारण कुश्चेव्हने २२ व्या कम्युनिस्ट पक्षाच्या काँग्रेसमध्ये आर्थिक वाढीची उद्दिष्टे निश्चित केली, त्यामुळे युद्धसाधनांची स्पर्धा कायम ठेवून आर्थिक विकास अविरत चालू ठेवणे कठीण झाले. अमेरिकनांच्या मनात असा उद्देश असो नसो. सोव्हिएटमधील परिस्थितीचे तर्कशास्त्र शृंगापत्तीत सापडले असे म्हणावे लागते. CIA चा अहवाल अर्धांशाने खरा मानला तरी असे म्हणावे लागते. पश्चिमी राष्ट्रांच्या धोरणात या गोष्टीला मुख्य स्थान असले पाहिजे की, कुश्चेव्हला आर्थिक विकास साधणे हा युद्धसाधनस्पर्धेपेक्षा अधिक महत्त्वाचे आहे असे मानणे अपरिहार्य वाटले पाहिजे.

## सोव्हिएट रशियातील कृषिविषयक पेचप्रसंग

[ 'फोरम सर्व्हिसच्या' १५ फेब्रुवारी १९६४ च्या पत्रिकेत जरेमी वुल्फेंडेन हा लेखक मास्को येथून असे कळवीत आहे की, मास्को येथे सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीची विशेष

बैठक चालू असून त्या कृषिविषयक पेचप्रसंगाची चर्चा चालू आहे. वुलफेंडेन याने या पेचप्रसंगाची कारणमीमांसा करताना नव्याने लागवडीस आणलेल्या भूमींचा विशेष निर्देश करून हा प्रश्न अत्यंत स्पष्ट स्वरूपात चर्चिला आहे, तो असा– ]

सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीची ही मुद्दाम विशेष रूपाने बोलविलेली बैठक आहे. एरवी या मध्यवर्ती समितीच्या बैठकी सहामाही भरतात, त्यास हा अपवाद आहे. या अपवादावरून असे सिद्ध होते की, सोव्हिएट कृषिशाखा महत्त्वाच्या संकटात सापडली आहे.

या संकटाची कथा आकडेवारीने स्पष्ट होते. कोणत्याही पश्चिमी देशापेक्षा सोव्हिएट युनियनमध्ये गव्हाच्या उत्पादनाचे क्षेत्र व त्या क्षेत्रात राबणारी लोकसंख्या जगात मोठी आहे. झारच्या काळी व स्टॅलिनच्याही वेळी रशियातील गहू बाहेरदेशी निर्यात होत होता. परंतु या वर्षी १ कोटी टनापेक्षा अधिक धान्य भांडवलशाही देशामधून आयात केले आहे. बिघाड कोठे झाला आहे ?

क्रुश्चेव्हने या संबंधात पुष्कळच कारणे दाखविली आहेत. हवामान वाईट होते; कडक हिवाळ्याने हिवाळी पिके मेली; तीव्र उन्हाळ्याने मोठी महत्त्वाची पिके रोडावली; शेतीची अवजारे निकामी बनली किंवा नीटपणे वापरली नाहीत; आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे खनिज खते फार अपुरी पडली आणि त्यांची उधळमाधळही झाली.

मध्यआशियातील सुप्रसिद्ध नवीन लागवडीस आणलेल्या भूमींना ही आपत्ती अधिक भोवली. कजगस्तानच्या उत्तरेस आणि सायबेरियाच्या दक्षिणेस हा भूभाग आहे. क्रांतीनंतर ४० वर्षेपर्यंत या प्रदेशात चराऊ राने होती आणि जनावरांचे भटके कळप होते. १९५३ सालापासून या भूभागात सोव्हिएट सरकारने धान्य निर्माण करणारा पट्टा निर्माण केला क्रुश्चेव्हने आपल्या मेंदूतून काढलेल्या या संततीकरिता तेव्हापासून जोराचा लढा दिला आहे सोव्हिएट कृषिशाखेत हे अभिमानाचे व निराशेचे स्थान मानले जाते. १९५८ साली १ कोटी ४० लक्ष टन धान्य येथे उत्पन्न झाल्यामुळे युरोपियन रशिया आणि युक्रेन येथील तुटीची भर झाली. परंतु यावर्षी ५० लक्ष टनच धान्योत्पादन या भागात झाल्यामुळे तेथील कामगारांना जगण्यापुरते व वेतन भागविण्यापुरतेही पीक झाले नाही, असे म्हणावे लागते.

यश व अपयश यांच्यात एवढे मोठे अंतर पडलेले पाहिल्यावर सोव्हिएट कृषिविषयक धोरणातील दोष अत्यंत उघड होतो. कोरडवाहू, गारठलेली व नापिकी मैदाने हट्टाने नांगरायची आणि लागवडीस आणायची, यापासून एवढाच फायदा होतो की, नांगरटीखाली असलेल्या जमिनीचा संख्यांक फुगवून दाखविता येतो. ही नांगरटीखालील क्षेत्रांची भर आर्थिकदृष्ट्या योग्य की अयोग्य हे कोणी पाहात नाही. सोव्हिएट आर्थिक मोजमाप पद्धतीत नफातोट्याचे व खर्चाचे व्यवस्थित अंदाज बांधणेही कठीण जाते. चराऊ राने गमावली त्यामुळे आर्थिक व्यय किती झाला याचाही हिशोब कोणी केलेला दिसत नाही. आणखी असे की शेतकामगार, ट्रॅक्टरचे यंत्रज्ञ, घरबांधणी, अन्नपुरवठा या गोष्टी सुधारलेल्या प्रदेशातून नेण्याचा खर्च कोणीही विचारात घेत नाही. तीन वर्षांच्या पुढील गोष्टींचा विचार कोणीही करीत नाही.

याचा परिणाम आता दिसत आहे. लागवडीस आणलेल्या नव्या भूमींपासून उतरत्या प्रमाणात प्राप्ती होऊ लागली आहे. विदेशी पंडितांचे असे मत आहे की, चांगली वाईट जमीन सरसकट नांगरटीखाली आणली त्यामुळे ती शेते, धुळींची आगरे बनली आहेत. या जमिनीमध्ये वारे थोपवून धरण्याकरिता वृक्षांच्या राजी लावाव्या अशा सूचना पुनः येऊ लागल्या आहेत. तिकडे पाठविलेला प्रत्येक

अधिक ट्रॅक्टर व प्रत्येक अधिक माणूस यांचेपासून होणारे उत्पादन घसरगुंडीला लागलेले आहे.

या जमिनी दुष्ट व तीव्र हवामानाने कायम घेरलेल्या असतात. मे महिन्यातील मध्यातल्या दहा दिवसात एक कोटी एकर जमीनीत गहू पेरला पाहिजे ! त्याच्या अगोदर बर्फाचे आच्छादन असते. उशीरा लागवड करण्यास पिकाला उशीर होऊन पिकाला पावसाळा गाठतो व पावसाळयानंतर लगेच हिवाळा झोंबू लागतो. ह्या प्रदेशाचा ' भूगोल ' असे सांगतो की, एकदम कोट्यवधि एकर जमिनीत पेरणी करा व प्रचंड शेतीची यंत्रसामग्री वापरा आणि एक लाख एकर जमिनींचा एकएक विभाग पाडून मशागत करा, त्याकरिता शेतीची यंत्रसामग्री अपुरी पडते व कुशल मानवशक्तीचा भरपूर पुरवठा करणे अशक्य होते. माणसांना ती जमीन व ते हवामान आकर्षित करू शकत नाही. त्या जमिनीत यांत्रिक शेतीच यशस्वी होऊ शकेल.

या नवीन लागवडीच्या जमिनीचे उदाहरण ऐकांतिक असले तरी सोव्हिएट रशियातील कृषिविषयक संकटाचे स्वरूप कशाप्रकारचे आहे याचे ते दिग्दर्शक उदाहरण आहे. सोव्हिएट रशियातील औद्योगिक प्रगति या ग्रामीण विभागातील शेतीच्या आधारावरच झालेली आहे. 'शेतीकडे वळा' 'खेड्यात चला ' असा आदेश कुश्चेव्ह देत आहे. परंतु या आदेशाची अंमलबजावणी अत्यल्प प्रमाणात होत आहे. बुद्धिमान व कुशल तरुण माणसे शहरे सोडून जाऊ इच्छित नाहीत. या गोष्टीस आवश्यक अशी चांगली संघटना बांधता आली नाही. किंवा जीवनोपयुक्त वस्तूंचे योग्य वितरणही करता आले नाही. हा केवळ आर्थिक प्रश्न नाही. मानसिक बाजूही विचारात घेतली पाहिजे. शेतीचा धंदा आकर्षक किंवा लोभनीय व्हावयास सामुदायिक शेतीची पद्धति अनुकूल होऊ शकत नाही. श्रमाचे मोठे व चिरस्थायी फळ मिळण्याबद्दल शेतकऱ्यास आश्वासन प्राप्त झाले पाहिजे. सामुदायिक शेतीतील त्याची भागिदारी व मिळणारा बोनस त्याला लोभनीय वाटत नाही. म्हणूनच रशियन शेतकरी आपल्या खाजगी जमिनीत अधिक श्रम करून अधिक चांगले उत्पन्न काढतो. ज्या ठिकाणी परंपरागत उत्कृष्ट शेतजमीन आहे तेथे म्ह. युरोपियन रशियात अधिकच गोंधळ आहे. सामुदायिक शेती तेथेही गोतेच खात आहे. क्रुश्चेव्हला अशाही स्थितीत काही प्रगति करण्यास वाव आहे. यंदासारखी वाईट स्थिति कायम राहील, असे नाही. परंतु हल्लींची अवाढव्य न पेलण्याजोगी सामुदायिक शेतीची व्यवस्था पश्चिमी देशातील खाजगी मालकीच्या शेतीच्या संस्थेची बरोबरी करू शकेल, अशी कल्पना करणे मात्र कठीण आहे. खते, कुशल कामगार, प्रशिक्षित प्रशासक आणि अखेरची पण महत्त्वाची गोष्ट म्हणजे शेतकऱ्याचा वैयक्तिक हितसंबंध या सर्व गोष्टी तेथे विरळ व त्रोटक प्रमाणातच उपलब्ध होत आहेत.

---



अनुक्रमणिका



# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्या वजनांचें मेट्रीक वजनांमध्यें सरळ रूपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेरऐवजी २३३ ग्राम मागितले जातात, तसेंच १ रत्तलाऐवजी ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेनें वस्तु मागणें हें दशमान पद्धतीच्या तत्त्वानुसार नाहीं. शिवाय यामुळें जुन्या पद्धतीप्रमाणेच आपणांस किचकट हिशेब करावा लागतो, परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २५० ग्राम, ३०० ग्राम, ४५० ग्राम अगर ५०० ग्राम मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | सध्या आतां मागवा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड वा स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड या हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |



योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा

| | |
|---|---|
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर वा छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर वा पाव (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ४० किलोग्राम |
| २.१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई